राष्ट्रीय चरित्रमाला

# अमीर खुस्रो

सय्यद गुलाम सम्नानी

अनुवाद
भगवंत देशमुख



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# एक

अमीर खुस्रोचा जन्म सुलतान नासिरुद्दीनच्या राजवटीच्या काळात झाला. परंतु त्याला कीर्ती व लोकमान्यता मिळाली ती सुलतान गियासुद्दीन बल्बनच्या काळात. रणांगणातील शौर्याची कदर करणारा बल्बन स्वतः मोठा तलवारबहाद्दर होता, देशांतर्गत शांततेसाठी तो सदैव प्रयत्नशील असे आणि आपल्या राज्याची अखंडता व स्वातंत्र्य टिकवून ठेवण्यात तो गढलेला असे. पण त्याबरोबरच विद्वानांचा व सत्पुरुषांचा तो आदरसत्कारही करीत असे. ज्या श्रेष्ठ व्यक्तींशी बल्बनचे निकटचे संबंध होते त्यात मौलाना बुऱ्हानुद्दीन महमूद, नज्मुद्दीन अब्दुल अजीज, शेख सिराजुद्दीन अबूबकर, काजी रुक्नोद्दीन सामानवी, मौलाना बुऱ्हानुद्दीन बजाज, मौलाना कमालुद्दीन जाहिद, मौलाना शम्सुद्दीन ख्वारिज्मी आणि मौलाना फख्रुद्दीन नायब यांचा समावेश होता. बल्बन स्वतः कोणी विद्वान नव्हता परंतु या श्रेष्ठ व्यक्तींच्या सद्‌गुणांचा ठसा मात्र त्याच्या व्यक्तिमत्वावर उमटलेला होता. विद्वानांची व सत्पुरुषांची बल्बनला एवढी ओढ असल्यामुळे कवींकडे मात्र त्याला विशेष लक्ष पुरविता आले नाही. तरी देखील जो कोणी त्याच्या दरबारात प्रवेश मिळवून त्याची प्रशंसा करीत असे, तो कधी रिक्तहस्ताने परतत नसे. शिवाय असे की, त्याचे दरबारी अमीर व राजपुत्र कवींना आश्रय देऊन त्याच्या या उणिवेची भरपाई करीत. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, विद्वानांची व सत्पुरुषांची विशेष ओढ असली तरी बल्बन काव्यकलेचा उत्साहभंग करीत नव्हता.

खाजशहीद या नावाने ओळखला जाणारा त्याचा वडील मुलगा शाहजादा मोहम्मद कवींचा मोठा आश्रयदाता होता. शम्स दबीर, काजी असीर, अमीर खुस्रो आणि अमीर हसन सिजझी यांनी त्याच्यावर *कसीदे* (प्रशंसाकाव्ये) लिहिले आहेत. शाहजादा मोहम्मदला काव्याचा एवढा नाद होता की, त्याच्या अवतीभवती नेहमी कवींचा घोळका जमलेला असे. मंगोलांनी जेव्हा हिंदुस्थानवर हल्ला केला आणि लाहोर, दिबालपूर व मुलतान उद्ध्वस्त करून टाकले त्यावेळी त्यांच्याशी लढताना शाहजादा मोहम्मद रणांगणावर मारला गेला. त्याच्या स्मृत्यर्थ अनेक कवींनी *मर्सिये* (विलापिका) लिहिले. अमीर खुस्रो आणि अमीर हसन सिजझी याप्रसंगी तेथेच होते. अमीर खुस्रोने मरहूम शाहजाद्याच्या स्मरणार्थ अनेक मर्सिये लिहिले. यापैकी पहिल्या *मर्सियाचे* अकरा *बंद* (विभाग) असून प्रत्येक बंदात बारा *शेर* आहेत. शाहजाद्याच्या आकस्मिक निधनाचे दुःख व्यक्त करताना ते म्हणतात :

''घडले ती वस्तुस्थिती आहे की, आकाशातून झालेला हा आघात आहे? हे एखादे महासंकट आहे की, *कयामत* (जगाचा अंतसमय) येऊन ठेपली आहे?

''वाऱ्याने फुलाच्या पाकळ्या इतस्ततः उडून जाव्यात तशी 'दोस्तांची महफिल' विखरली गेली आहे. बागेत जणू पानझडीचा मोसमच आलेला आहे. लोकांच्या डोळ्यांतील अश्रूंचे प्रवाह चारी दिशांनी असे वाहत आहेत जणू मुलतानमध्ये दुसरा एक पंजाबच (पाच प्रवाहांचा समूह) प्रगट झाला आहे.

''बादशहाने लष्करासह मुलतानहून कूच केले व आपली काफिराचा (इस्लामच्या मते पाखंडी) घात करणारी तलवार काफिराविरुद्ध उपसली, ती कोणती अशुभ घडी होती?

''जेवढे लष्कर हाताशी होते. तेवढ्याच्या बळावरच तो लढत राहिला. अधिक लष्कराची कुमक येण्याची त्याने वाट बघितली नाही, कारण सैन्यांचे उपकार स्वीकारणे *रुस्तुमला* शोभा देत नाही. शत्रूच्या बळाची बातमी जेव्हा त्याला देण्यात आली तेव्हा त्याला त्वेष आला व त्याने आपला ध्वज अधिकच उंच फडकाविला.

''(त्याला वाटले) या वर्षी मी शत्रूच्या रक्ताने भूमी अशी रंगवून टाकीन की, संध्येला देखील ती रक्तिमा हवीशी वाटेल.

''तो तर अशा कल्पनेत दंग होता आणि नियतीने त्याच्या योजनेच्या आलेखावर परमेश्वरी इच्छेची फुली मारली होती. याचा त्याला पत्ताही नव्हता.

''काफिरांचा शाही लष्करावर हल्ला झाला, ती कसली वेळ होती? टोळ्या-टोळ्यांनी त्यांनी नदी ओलांडली व एकाएकी शाही सैन्यावर ते तुटून पडले.'' (मूळ फारसी)

शाहजादा मोहम्मदविषयी अमीर खुस्रोला जाणवणारी आत्मीयता या काव्यातून उत्तमरीतीने प्रकट झाली आहे. या काव्यात कवीच्या कल्पनेची भरारीच केवळ नाही तर त्यातील प्रत्येक शब्दात व्यथा आणि वेदना, खेद आणि दुःख व अतृप्त आशा आणि अपेक्षा यांचा जणू अर्कच उतरला आहे. खुस्रोचा मित्र अमीर हसन सिजझी यांनीही शाहजादा मोहम्मदच्या आकस्मिक मृत्यूचा शोक व्यक्त करण्यासाठी गद्यरचनेचा अवलंब केला आहे.

''या भयानक आपत्तीच्या व संकटाच्या काळी दैवाच्या या भात्यातील एक बाण, युद्धाच्या या गगनातील जणू शाहीबाजच अशा शाहजाद्याच्या बाहूला लागला व त्याचा आत्मविहंग त्याच्या देहातून निघून जन्नतच्या बागेकडे उडून गेला.

आम्ही परमेश्वरासाठी आहोत व त्याच्याकडेच परत जाणार आहोत. यात शंका नाही, पण यावेळी मोहम्मदाच्या (त्याला सदैव शांती लाभो) धर्माची पाठ अनार्यांच्या हृदयाप्रमाणे भग्न झाली आणि इस्लामच्या तटाची भिंत अज्ञात पथिकांच्या कबरीप्रमाणे ढासळली, देशाच्या बाहूंचे बळ संपून गेले.''

समकालीन इतिहासकार झियाउद्दीन बर्नी याने अमीर खुस्रो व हसन दैहलवी यांना शाहजादा मोहम्मदच्या मृत्यूचा शोक करताना असे म्हणताना ऐकले की, आमच्या देवाने साथ दिली असती तर शाहजादा वाचला असता आणि बल्बनच्या नंतर राजसिंहासनाचा व राजमुकुटाचा वारसा ठरला असता. खुस्रोचा *मर्सिया* पद्यात तर हसन देहलवीचा गद्यात असून, दोहोंतही शाहजाद्याच्या अनपेक्षित मृत्यूचे तीव्र दुःख व्यक्त झाले आहे. दोघांच्याही दृष्टीने शाहजादा काव्यकलेचा रसिक व आश्रयदाता होता परंतु त्याला आयुष्य मात्र अत्यंत अल्प लाभले. ही खेदाची गोष्ट होती. तो जर अधिक जगला आणि आपले कर्तृत्व प्रगट करण्याची संधी जर त्याला मिळाली असती तर हिंदुस्थानात फारसी साहित्याच्या इतिहासाला एक निराळी दिशा लागली असती यात काहीच संशय नाही!

गुलामवंशीय बाहशहांच्या राजवटीत कवींना व विद्वानांना अत्यंत अनुकूल वातावरण लाभले, कवींना काव्यरचनेचे पूर्ण स्वातंत्र्य होते. आपल्या भाव-भावनांचा मुक्त आविष्कार ते करीत. या संदर्भात अमीर खुस्रो तर विशेषच सुदैवी होते आणि म्हणूनच भावी पिढ्यांच्या कृतज्ञतेस व गौरवास ते पात्र ठरले.

अबुल हसन यमिनुद्दीन खुस्रो नंतर अमीर खुस्रो या नावाने प्रसिद्धी पावले. त्यांचा जन्म उत्तर प्रदेशातील ईटा जिल्ह्यामधील मोमीनपूर (सध्याचे पटियाली) या गावी इ. स. 1253 (हि. 651) साली झाला. दारा शिकोहने *सफियतुल् अवलिया* या आपल्या ग्रंथांत खुस्रोच्या जन्मगावाचे नाव 'मोमिनाबाद' असे दिले आहे.

*गुर्रतुल्कमाल* या ग्रंथाच्या आपल्या प्रास्ताविकात अमीर खुस्रोने आपले वडील अमीर सैफुद्दीन महमूद यांच्याविषयी पुढील उद्‌गार काढले आहेत, "माझे वडील शम्सी (शम्सुद्दीन अल्तमशशी संबंधित असल्यामुळे), यांनी आपल्या ललाटीच्या प्रकाशरेखेमुळे लौकिक प्राप्त केला होता."

अमीर सैफुद्दीन तुर्क होते आणि हजारा कबिल्याशी त्यांचा संबंध होता. इसवीसनाच्या बाराव्या शतकात मंगोलांनी सारे इस्लामी जगत उद्‌ध्वस्त केले होते. अब्बासिया वंशाची सत्ता आणि वैभव धुळीस मिळविले होते. इस्लामी सभ्यतेचे आणि संस्कृतीचे हृदयच असलेल्या बगदादचा विध्वंस झाला होता. सर्वत्र दहशतीची आणि रानटी क्रूरतेची सत्ता होती आणि या ईश्वरी आघातापासून कोणाचीही सुटका नव्हती, कोणीही सुरक्षित नव्हते. या महान संकटाच्या काळी आपल्या घरादाराला वंचित झालेल्या अनेक निराधारांपैकीच अमीर खुस्रोचे वडील, अमीर सैफुद्दीन महमूद हेही एक होते. *कब्तुल खिजरा* म्हणून ओळखले जाणारे बलखदेखील जमीनदोस्त झाले. अशा जागतिक इतिहासातील त्या आणीबाणीच्या काळात, हिंदुस्थान हा एकच देश असा होता, जेथे हे निराधार निर्वासित स्वस्थतेने जीवन जगू शकत होते. साहजिकच अमीर सैफुद्दीन महमूदही हिंदुस्थानात येऊन दिल्लीचे रहिवासी बनले. दिल्लीच्या तख्तावर तेव्हा शमसुद्दीन अल्तमश विराजमान होता. अमीर सैफुद्दीन महमूद यांनी शाही दरबारात प्रवेश

मिळविला. शाही दरबारात प्रविष्ट झाल्यावर अमीर सैफुद्दीन महमूद यांच्याकडे कोणते पद देण्यात आले, यासंबंधी जरी इतिहासकार काही सांगत नसले तरी एखादे मानाचे आणि महत्वाचे अधिकारपद त्यांच्याकडे सोपविण्यात आले असावे हे मात्र निश्चित! कालांतराने पटियालीची जहागीर त्यांना मिळाली. दौलतनाझ या इमादुल्मुल्करच्या कन्येबरोबर त्यांचा झालेला विवाह ही घटनादेखील त्यांना लाभलेल्या वरिष्ठ दर्जाचीच द्योतक म्हणावी लागेल. खुस्रोनेदेखील त्यांच्या पावित्र्याविषयी, दयार्द्रतेविषयी गुर्रतुल्कमालच्या प्रस्तावनेत म्हटले आहे, "ते या जगात अमीर होते व या जीवनानंतरही त्यांना *उम्मी* असण्याचेही भाग्य लाभले होते." (*उम्मी* म्हणजे निरक्षर, पण साक्षात्कारी व्यक्तीसाठीही हा शब्द योजिला जातो.)

अन्यत्र एका ठिकाणी अल्तमशची स्तुती करताना त्यांनी आपल्या वडिलांविषयी पुढील उद्‌गार काढले आहेत, "अल्तमश एका अशा व्यक्तीच्या सामर्थ्याच्या व धैर्याच्या बळावर सर्वत्र विजय मिळवीत होता, जिला परमेश्वराने त्याच्यापासून हिसकावून नेले."

झियाउद्दीन बर्नने म्हटले आहे की, अमीर सैफुद्दीन महमूदला शाही खजिन्यातून वर्षाला दहा हजार *तंके* (तत्कालीन नाणे) मिळत असत.

इमादुल्मुल्काच्या कन्येशी विवाह झाल्यानंतर अमीर सैफुद्दीन महमूदला तिच्यापासून तीन पुत्र झाले. पहिला इज्जुद्दीन अली शाह, दुसरा अबुल हसन ममीनद्दीन खुस्रो व तिसरा हिस्तमुद्दीन कतलग.

असे म्हणतात की, खुस्रोचा जन्म झाल्याबरोबर त्याच्या वडिलांनी कपड्यात गुंडाळून त्याला एका साधू पुरुषाकडे नेले तेव्हा या बालकास बघता क्षणीच तो उद्‌गारला, "तू ज्याला माझ्याकडे आणले आहेस तो खाकानीच्याही (इराणचा प्रसिद्ध कवी) दोन पावले पुढे जाणार आहे."

खुस्रो जेव्हा थोडे मोठे झाले तेव्हा त्यांना शिक्षणासाठी मक्तबमध्ये पाठविण्यात आले. अमीर खुस्रोचे वडील स्वतः निरक्षर होते. त्यांची कुलपरंपरा योदध्यांची होती तरी पण आपल्या मुलाच्या शिक्षणाची, विकासाची मात्र त्यांनी विशेष आणि योग्य व्यवस्था केल्याचे दिसून येते. या व्यवस्थेनुसार खुस्रोला ख्वाजा सादुद्दीन यांचे शिष्यत्व पत्करावे लागले. खुस्रोने त्यांच्याकडून अक्षरलेखनकला प्राप्त केली. मात्र स्वतः खुस्रोच्या सांगण्यावरून हे स्पष्ट होते की, काव्यकलेची सावली बालपणापासूनच त्यांच्यावर पडू लागली होती. *तोहफतुल्सिगर* या आपल्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत खुस्रोने एका घटनेचे वर्णन केले आहे. ख्वाजा सादुद्दीन या आपल्या शिक्षकाबरोबर एकदा ते ख्वाजा असील कोतवाल यांच्याकडे गेले. तेथे ख्वाजा इज्जुद्दीन या गाढ्या विद्वानाशी त्यांची भेट झाली. हे तेथे पोहोचले तेव्हा ख्वाजा इज्जुद्दीन यांच्या हातात एक ग्रंथ होता. आपला शिष्य म्हणून ख्वाजा सादुद्दीन यांनी खुस्रोची त्यांच्याशी ओळख करून दिली व "हा मुलगा शेर फार चांगल्या सुरावटीत म्हणतो," असेही सांगितले. हे ऐकून ख्वाजा

इज्जुद्दीन यांनी आपल्या हातातील ग्रंथ खुस्रोला दिला व त्यातून काही शेर म्हणण्यास सांगितले. खुस्रोने शेर म्हणून दाखविले, तेव्हा ख्वाजा इज्जुद्दीन यांनी मुक्तकंठाने त्यांचे कौतुक केले. त्यानंतर ख्वाजा सादुद्दीन यांनी खुस्रोला काव्यरचनेची हौस असल्याचेही ख्वाजा इज्जुद्दीन यांना सांगितले व कवितेला हा मुलगा कितपत न्याय देऊ शकेल याची चाचणी घेण्यात यावी अशी इच्छा प्रगट केली. ख्वाजा इज्जुद्दीन यांनी केस, अंडे, बाण आणि खरबूज या चार असंगत वस्तूंचा, सुसंगत उल्लेख केलेला असेल अशी कविता रचून दाखविण्यास खुस्रोला सांगितले. थोड्याच वेळात खुस्रोने पुढील आशयाची एक चतुश्चरणी कविता त्यांना ऐकविली :

"त्या सुंदरीच्या केशकलापात अनेक सुगंधी अंडी (कुरळ्या केसांची अंडाकार वलये) दडलेली आहेत. तिचे हृदय बाणासारखे सरळ आहे असे समजू नका, कारण खरबुजाप्रमाणे तिचे दातही तिच्या पोटात आहेत."

ख्वाजा इज्जुद्दीन यांना खुस्रोच्या या शीघ्र कवितांचे मोठे आश्चर्य वाटले आणि त्यांनी खूप कौतुक करून प्रोत्साहन दिले. खुस्रोच्या वडिलांचा शाही दरबाराशी संबंध असल्याचे जेव्हा त्यांना कळले तेव्हा *सुल्तानी* हे टोपण नाव *(तखल्लुस)* धारण करून काव्यरचना करावी, अशी त्यांनी खुस्रोला सूचना केली. खुस्रोने ही सूचना स्वीकारली आणि *तोहफतुस्सिगर* या त्याच्या काव्यसंग्रहातील अनेक गजलांत हेच नाव वापरण्यात आले आहे.

अशा रीतीने स्तुतीच्या, कौतुकाच्या व प्रोत्साहनाच्या वातावरणात खुस्रो आपल्या जीवनाची वाटचाल करू लागले, पण या लहान वयात अजून आपल्या वाटचालीच्या पाऊलखुणा अस्पष्ट असतानाच एक मोठा आघात त्यांना सहन करावा लागला. मंगोल आक्रमकांशी उडालेल्या एका चकमकीत त्यांचे वडील मारले गेले. ज्या वयात केवळ आनंद आणि हास्य अपेक्षित होते त्याच वयात त्यांना हा कठीण आघात सोसावा लागला. संस्कारक्षम बुद्धी आणि संवेदनशील हृदय लाभलेल्या खुस्रोने, आपले हे तीव्र दुःख नंतरच्या काळात पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे :

"माझ्या मस्तकावरून *सैफ* (तलवार—वडिलांचा श्लेषाने नामनिर्देश) निघून गेली आणि माझ्या हृदयाचे दोन तुकडे झाले. माझी नदी वाहत गेली आणि मोती मात्र एकटे एकाकी राहिले."

वडिलांच्या अकाली मृत्यूने कमालीचे एकाकीपण व तीव्र वियोगदुःख यांनी खुस्रोला व्यापून टाकले. परंतु त्यांचे आजोबा, इमादुल्मुल्क यांनी मोठ्या प्रेमाने काळजीपूर्वक त्यांचे संगोपन केले. स्वतः इमादुल्मुल्कही एक महत्त्वाची आणि प्रभावी व्यक्ती होते. इमादुल्मुल्क यांच्या अतीव जिव्हाळ्याने व प्रेमाने खुस्रोच्या दुःखांची तीव्रता खूपच बोथट केली व आपल्या जीवनाचा मार्ग स्वतःच शोधण्याची संधी त्यांना प्राप्त करून दिली. खुस्रोने काव्य आणि साहित्याची वाट निवडली व शेवटी आपले उद्दिष्टस्थळ गाठले.

खुस्रो वीस वर्षांचे झाले तेव्हा त्यांचे आजोबा इमादुल्मुल्क आपल्या वयाच्या एकशे तेराव्या वर्षी सत्तत्वात विलीन झाले. ज्यांच्या प्रेमामुळे आणि जिव्हाळ्याने खुस्रोला काव्याच्या क्षेत्रातील अधिपतींचे स्थान मिळाले त्या आपल्या आजोबाच्या मृत्यूने झालेला शोक एका प्रभावी विलापिकेत *(मर्सिया)* त्यांनी प्रगट केला आहे. ते म्हणतात :

"तो दिवा विझला, आकाशातील ज्योत काजळली. अरेरे! दोन्ही जगांच्या पायाची भिंत ढासळली! अर्जदार शाही दरबारात का बरे जात नाहीत? तो कार्यकुशल वजीर कोठे लपून बसला? आणि राजमहालाजवळ का येत नाही?

हे आसिफ! सुलतानदेखील तुझ्यासाठी रडत आहे आणि सारा महालही तुझ्या शोकात मग्न आहे.

तुर्कांनी आपली शिरावरणे टाकून दिली आहेत आणि तीव्र शोकाच्या आवेगात आपले वेष गळ्यापासून कमरेपर्यंत फाडून टाकले आहेत, तर दुसरीकडे हिंदू धनिकवर्ग, ब्राह्मणाप्रमाणे उघड्या मस्तकाने रडून रडून आपली वेदना आणि दुःख प्रकट करीत आहेत."

आतापर्यंत खुस्रोला कवी म्हणून काही मान्यता प्राप्त झालेली होती. आजोबांच्या मृत्यूने, या अननुभवी स्थितीतच त्यांच्यावर काही अशा जबाबदाऱ्या टाकल्या की, ज्यांच्याकडे तात्काळ लक्ष पुरविणे आवश्यक होते. कवी म्हणून खुस्रोचे भविष्य उज्ज्वल होते. तत्कालीन परंपरेप्रमाणे त्यांना आता गुणांची कदर करणाऱ्या व काव्याची जाण असणाऱ्या आश्रयदात्याचा आधार आवश्यक होता.

अल्लाउद्दीन किश्ली खान अलग कतलग मुबारक बादबक यामध्ये असे व्यक्तित्व खुस्रोला आढळले. सामान्यतः 'मलिक छज्जू' या नावाने तो ओळखला जात असे. गियासुद्दीन बल्बनचा तो पुतण्या होता व मोठा दानशूर म्हणून प्रसिद्ध होता. विद्वानांचा व कवींचा तो मोठा चाहता आणि गुणग्राहक होता. तसाच उदारही होता. त्याच्या लोकप्रियतेमुळे स्वतः बादशहालाही त्याचा हेवा वाटत असे. असे सांगतात की, एकदा एका कवीने त्याच्या स्तुतीपर *कबन* (कसीदा) म्हटले तेव्हा तो इतका संतुष्ट झाला की, आपल्या तबेल्यातील सर्व घोडे त्याने त्या कवीला देऊन टाकले. असे प्रभावी व्यक्तिमत्व असलेला आश्रयदाता आपणास योग्य होईल असे खुस्रोला वाटले. त्याच्या कृपेच्या सावलीत आपल्या काव्यशक्तीला पंख फुटतील व ती फलद्रूपही ठरेल असा त्याला पूर्ण विश्वास होता.

किश्ली खानाचा आश्रय स्वीकारण्यापूर्वी खुस्रोने आपल्या ज्या काही समकालीन व्यक्तींची प्रशंसा करणारे *कसीदे* लिहिले होते, त्यात शम्सुद्दीन दबीर, अमीर अली सरंजदार, एख्त्यारुद्दौला हसामोद्दीन आणि इमादुल्मुल्कचा मुलगा आणि वारस मलिक महमूद यांचा समावेश होता. शेवटी किश्ली खानाचीच त्यांनी आपला आश्रयदाता म्हणून निवड केली. खुस्रोसारख्या प्रतिष्ठित व्यक्तीचा आपल्या दरबारी मंडळीत समावेश करता

आल्याचा किश्ली खानालाही मोठा अभिमान वाटला. त्याची स्तुती करताना खुस्रो म्हणतात : "पहाटेला मी विचारले की तुझा सूर्य कोठे आहे? आणि तिने मलिक छज्जूचे मुख मला दाखविले." दोन वर्षे, खुस्रो किश्ली खानाचे आश्रित म्हणून राहिले आणि या कालावधीत त्याच्या उदारतेचा फायदा त्यांना मिळत राहिला. मात्र दोन वर्षांनी त्यांना हा आश्रय सोडावा लागला. या घटनेची स्वतः खुस्रोंनीच जी कारणे दिली आहेत ती अशी :

"एक दिवस बादशहाचा धाकटा पुत्र बुगराखान त्या महान खानाकडे पाहुणचारासाठी आला. त्यांचे चुलत भावाचे नाते होते. या भेटीविषयी मात्र गुप्तता राखण्यात आली होती. कारण चैन व विलासांनी रंगणाऱ्या अशा मैफलींची वार्ता बादशहापर्यंत पोचत असे. राजपुत्राबरोबर त्याचे काही खाजगीतील लोक होते. शम्सुद्दीन दबीर व काजी अमीर यांचा या लोकांत समावेश होता. या दोन विद्वानांची उपस्थिती म्हणजे दोन तेजस्वी ताऱ्यांची युतीच म्हटली पाहिजे. त्या दोघांच्या रुपाने जणू चंद्र-सूर्यच एकत्र आले होते. त्यांच्या तुलनेत माझी स्थिती एखाद्या लहान चांदणीसारखी! या मैफलीत मला प्रवेश मिळाला याचा फार अभिमान वाटला. त्या दोघांनी आपल्यापरीने काव्युक्तींनी सारे क्षेत्र प्रभावित करण्याचा प्रयत्न केला पण उत्तरात मी काव्यवीणेची तार अशा आत्मविश्वासाने छेडीत राहिलो की, ते मला निष्प्रभ करू शकले नाहीत. दोन्ही बाजूंनी काव्याचा जो कल्लोळ उसळला त्याने त्या दोघा राजपुत्रांचे व त्यांच्या परिवारातील लोकांचे कान पुरते उघडले आणि त्यांच्या दातृत्वाच्या अमाप मेघवृष्टीने पृथ्वीतलावरील प्रत्येक वस्तू भिजून चिंब झाली. कवी आपला काव्याविष्कार करीत होते. तेव्हा आश्चर्यचकित करणारा सुवर्णवर्षाव होत होता. उधळल्या जाणाऱ्या दीनारांकडे बघणाऱ्यांची दृष्टीही सुवर्णवर्ण झाली आणि गोळा केलेल्या सोन्याच्या ओझ्याने फाटलेले त्याच्या अंगरख्याचे घोळदेखील गुलाबाच्या विकीर्ण फुलांप्रमाणे दिसू लागले. माझे मधुर काव्य बुगराखानला इतके आवडले की, राजे आणि राजपुत्रांना शोभणाऱ्या उदारतेने त्याने त्याच्यातर्फे एक तबक भरून चांदीचे तंके (एक नाणे) मला पारितोषिक म्हणून देण्याची आज्ञा केली. त्यांच्या या उदार देणगीने त्यांनी मला आपला कृतज्ञ गुलाम बनवून टाकले."

खुस्रो पुढे म्हणतात :

"आमच्या खानाचा स्वभाव फार मत्सरी होता. लागलीच त्याच्या चेहऱ्यावर नापसंतीच्या खुणा दिसू लागल्या. मी ते बघितलं. आणि त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. पण माझ्या कसल्याच बोलण्याकडे त्याने लक्ष दिले नाही. या घटनेला बरेच दिवस झाले तरीही तिचा विसर त्याला पडू शकला नाही. तो मला शिक्षा करू इच्छित होता. आपल्या क्रोधाच्या बाणाचे मला लक्ष्य बनवू पाहत होता. याची मला कल्पना आली. तेव्हा माझे हृदय व्यथित झाले, (आणि पलायन करून आपला जीव

वाचविणे मला अधिक योग्य वाटले.) परिणामतः कमानीतून सुटलेल्या तीराप्रमाणे मी तेथून निसटलो.''

अशारीतीने किश्ली खानाच्या रागाला घाबरून आणि संबंध अधिक बिघडू नयेत म्हणून खुस्रो सामाना येथे बुगरा खानाच्या आश्रयाला आले. बुगरा खानानेही त्यांचे मोकळ्या मनाने स्वागत केले व त्यांची मनसबही वाढवून दिली. खुस्रोने त्याच्या प्रशंसापर कसीदे लिहिले. आपल्या वडिलांबरोबर बुगरा खान एका मोहिमेवर लखनोतीला गेला नसता तर ते त्याच्याजवळच राहिले असते. ते स्थान खुस्रोला आवडले नाही. आपल्या अमीरांच्या मध्यस्थीने बुगरा खानने खुस्रोचे मत परिवर्तन करण्याचा बराच प्रयत्न केला परंतु त्यांनी मानले नाही व बल्बनबरोबर तेही दिल्लीला परत आले.

बल्बन विजय मिळवून परतला होता व दिल्लीवासियांनी या विजयाचा मोठा सोहळा साजरा केला. विजयी सुलतानाला मौल्यवान नजराणे अर्पण करण्यात आले. या विजयाची वार्ता सुलतानचा गव्हर्नर म्हणून काम पाहणारा, सुलतानाचा ज्येष्ठ पुत्र युवराज मोहम्मद कान यास कळाली तेव्हा तोही बादशहाला आपली भेट नजर करण्यासाठी समक्ष हजर झाला. खुस्रोने त्याच्याशी झालेल्या आपल्या भेटीचे असे वर्णन केले आहे : ''त्या काळी आदरणीय खान महान कान मलिकदेखील जाम (?) च्या विजयानंतर दिल्लीला आला होता. माझे नशीब त्याच्याशी संबंधित होणार होते. म्हणूनच मोठी मेहेरबानी करून माझ्या काव्यनिर्मितीसंबंधी विचारणा केली. नवीनच रचलेले काही शेर घेऊन मी त्यांच्याकडे गेलो. शाहजाद्याने माझ्या रचनांची खूप स्तुती केली आणि मला मानाची वस्त्रे, शिरोभूषण यांची भेट दिली.''

शाहजाद्याने खुस्रोला आपल्याबरोबर मुलतानला चलण्यास सांगितले. त्याची आज्ञा मानण्यावाचून खुस्रोला गत्यंतरच नव्हते. खुस्रोच्याच शब्दात सांगायचे तर, त्यांनी सेवेचा पटका आपल्या कमरेला बांधला आणि दोस्तीची टोपी मस्तकावर धारण केली. एकटे खुस्रोच नव्हे, तर त्यांचे मित्र अमीर नजमुद्दीन हसन सिजझीदेखील शाहजाद्यासह मुलतानला गेले. दोघेही मुलतानला शाहजाद्याच्या मृत्यूपर्यंत पाच वर्षे राहिले. शाहजादा मोहम्मद मंगोलांशी लढताना मारला गेला, याचा उल्लेख आधी आलेला आहे. शाहजाद्याच्या अकाली मृत्यूने, खुस्रो व हसन सिजझी या दोघांनाही मोठा धक्का बसला. त्यांच्या दृष्टीने शाहजादा म्हणजे मूर्तिमंत उदारता आणि दानशूरता! मंगोलांनी या दोघांनाही कैद केले पण कसे तरी दोघेही दिल्लीला परत आले आणि शाहजाद्याच्या मृत्यूची वार्ता त्यांनीच दिल्लीत प्रकट केली. मंगोलांच्या कैदेतील आपल्या अवस्थेचे वर्णन करताना खुस्रो म्हणतात :

''काफिरांनी मांडलेल्या विध्वंसात यावर्षी मुलतानमध्ये, मुसलमानांचा उजवा पंख तुटला हे तुम्हाला माहीत आहे काय?

हुतात्म्यांच्या रक्ताने जमीन पाण्याने भिजावी तशी भिजली होती. हारांमध्ये

फुले गुंफलेली असावीत तसे कैदी दोऱ्यांनी बांधले होते. फासात अडकविलेली त्यांची मस्तके एकमेकांवर आपटत होती. त्यांच्या गळ्याभोवती दोरखंडांच्या करकचून गाठी मारलेल्या होत्या. या आकस्मिक संकटातून मी बचावलो खरा, पण मला कैदी बनविण्यात आले. मृत्यूच्या भीतीने माझ्या दुर्बल शरीरात रक्ताचा थेंबही शिल्लक नाही. पुराच्या धारेप्रमाणे मला पळावे लागत होते. या धावपळीने माझ्या पायाला बुडबुड्यासारखे शेकडो फोड आले व त्वचेला भेगा पडल्या. या संकटामुळे मात्र जीवन तलवारीच्या मुठीसारखे कठीण आणि कुऱ्हाडीच्या दांड्यासारखे शुष्क वाटू लागले. माझे शरीर, पानझड झालेल्या वृक्षाप्रमाणे उघडे होते व काटेरी झुडपांच्या हजारो ओरखड्यांनी जागजागी चिरफाळले होते. नववधूच्या मानेवरून मोती ओघळावेत तसे माझ्या डोळ्यांतून अश्रू ठिबकत होते. जो दुष्ट माणूस माझ्या मागे लागला होता व मला सारखा पुढे पळवीत होता. तो एखादा चित्ता टेकडीवर बसावा तसा आपल्या घोड्यावर स्वार होता. त्याच्या मुखातून दुर्गंध येत होता व त्याच्या गचाळ मिशा हनुवटीपर्यंत लोंबत होत्या, थकल्यामुळे माझ्या पळण्याचा वेग मंदावला तर कधी आपल्या कट्यारीने तर कधी खंजिराने धमकावीत होता. निराशेने मी निःश्वास टाकीत होतो. या संकटातून आपल्याला कधीच मुक्ती मिळणार नाही असे मला वाटू लागले. पण त्यातूनही माझी सुटका झाली, तीही हृदयात बाण न घुसता व शरीरावर तलवारीचा वार न पडता, हे त्या परमेश्वराचे अनंत उपकारच म्हटले पाहिजेत.''*

मुलतानमधील शाहजाद्याबरोबरच्या वास्तव्यात खुस्रोंनी अनेक शेर रचले व त्याच्या स्तुतीपर तेवीस कसीदे लिहिले. आजवर अन्य कोणासाठी त्यांनी अशी रचना केली नव्हती. या काळात त्यांनी अशी उंची गाठली की, जी प्रत्येकाला हवीशी वाटते पण फार थोड्यांच्या वाट्याला येते. मुलतानमध्ये खुस्रोला सर्व तऱ्हेच्या सुखसोयी आणि चैनीच्या व सुखोपभोगाच्या सर्व संधी उपलब्ध होत्या हे खरे, परंतु दिल्ली आणि दिल्लीतील निर्व्याज सुंदरींचा त्यांना क्षणभरही विसर पडला नव्हता. शाहजादा मोहम्मदच्या मृत्यूने बल्बनवर दुःखाचा फार मोठा आघात झाला. ऐंशी वर्षांच्या वयात असा आघात क्वचितच कोणी सहन करू शकेल! बादशहा आपली दैनंदिन कर्तव्ये नियमितपणे पार पाडीत होता खरा, पण शाहजाद्याच्या मृत्यूचे दुःख त्याला खात होते आणि आता आपलेही दिवस जवळ आले आहेत हे त्याला कळून चुकले होते. लखनौतीस असलेला आपला दुसरा मुलगा बुगरा खान याला आपला उत्तराधिकारी करावे, अशी त्याची इच्छा होती. परंतु काही कारणाने तो यास तयार झाला नाही. यानंतर बादशहाने मृत शाहजादा मोहम्मदचा मुलगा कैखुस्रो याजकडे आपली दृष्टी वळविली व त्याला आपला उत्तराधिकारी नेमण्याची इच्छा

* अमीर खुस्रो : गुर्रतुल्‌कमालची प्रस्तावना.

प्रकट केली. या योजनेला कोतवाल मलिकुलउमरा यांनी विरोध केला कारण काही झालं तरी कैखुस्रो शाहजादा मोहम्मदचा मुलगा होता व शाहजादा मोहम्मदविषयी त्याच्या मनात अढी होती. शेवटी कोतवाल मलिकुलउमरा यांच्या प्रभावाने बुगरा खानचा मुलगा मोइजुद्दीन कैकुबाद याला युवराज नियुक्त करण्यात आले.

अठरा वर्षे वयाचा कोवळा तरुण राजपुत्र बादशहाचा उत्तराधिकारी झाला. त्याचे संगोपन बल्बनच्या कर्मठ धर्मनिष्ठेच्या प्रभावात झाले होते. भौतिक सुखांची त्याला काहीच जाण नव्हती. तो एक निष्कलंक चारित्र्य असलेला निरागस तरुण होता. पण आता मात्र त्याला जाव विचारणारे कोणी नव्हते. जीवनातील सर्व सुखोपभोग जणू नग्न रूपात त्याच्या समोर नृत्य करीत होते. आता मदिरा आणि मदिराक्षी या त्याच्या नित्याच्या गोष्टी झाल्या होत्या आणि इतर लोक आपल्या इच्छेप्रमाणे सत्ता चालवीत होते. प्रमुख वजीर मलिक निजामुद्दीन हाच प्रत्यक्षात बादशहा होता. कैकुबाद आता अनेक दोषांची शिकार झाला होता. राज्याच्या प्रश्नांकडे लक्ष देण्यास त्याला आता फुरसतच मिळत नव्हती. साहजिकच दिल्लीचा दरबार अनेक कटकारस्थानांचे केंद्र बनला होता. बल्बनने कैखुस्रोला मुलतानला पाठवून दिले होते. मलिक निजामुद्दीनच्या चिथावणीने त्याचा वध करण्यात आला. संपूर्ण राज्यात अफरातफर, सामाजिक आणि नैतिक अधःपतन व दैन्यावस्था यांनी गोंधळ घातला होता. वीस वर्षे प्रमुख वजीर म्हणून, वीस वर्षे बादशहा म्हणून जे राज्य बल्बनने चाळीस वर्षाच्या सततोद्योगाने निर्माण केले होते त्याच्या एकतेलाच राज्यातील असंतोषाचा धोका निर्माण झाला होता.

विलासी कैकुबादचा बाप बुगरा खान यास या गोष्टी माहीत नव्हत्या असे नव्हे. आपल्या मूर्खपणाने जे दिल्लीचे सिंहासन यापूर्वी हातचे गमावले होते ते प्राप्त करण्याचा आता त्याने निर्णय केला. राज्यातील नैतिक आणि सामाजिक दोषांना व त्यामुळे निर्माण झालेल्या गैरव्यवस्थेने सारे राज्य विनाशाच्या काठावर आणण्यास जबाबदार असलेल्या प्रत्यक्ष आपल्या मुलालाच त्यासाठी सिंहासनावरून दूर करणे आवश्यक होते. त्याने दिल्लीकडे कूच केले. बादशहाला या घटनेची वार्ता कळाली तेव्हा तोही मोठ्या गर्वाने प्राप्त परिस्थितीला तोंड देण्यासाठी बाहेर पडला. शाहजादा मोहम्मदच्या मृत्यूनंतर ज्या हातिम खान खानेजहाँचा खुस्रोने आश्रय स्वीकारला होता, तोही यावेळी बादशहाच्या परिवारात होता. साहजिकच खुस्रोदेखील त्यात समाविष्ट होते व वेगाने बदलणाऱ्या परिस्थितीचे सूक्ष्म दृष्टीने निरीक्षण करीत होते. सुदैवाने, पितापुत्रांमध्ये होऊ घातलेला रक्तमय संघर्ष कसा तरी थांबविला गेला आणि शमसुद्दीन दबीरसारख्या काही प्रतिष्ठित आणि सत्यप्रवृत्त व्यक्तींनी मध्यस्थी करून पितापुत्रांत समझोता घडवून आणला. सुदैवानेच प्राप्त झालेल्या या आनंदोत्सवाच्या प्रसंगी, खुस्रोसारख्या माणसाला गप्प राहणे कसे बरे शक्य होते? याप्रसंगी एक कसीदा लिहून त्यांनी बादशहाच्या सेवेत रुजू केला. त्यात ते म्हणतात :

"जेथे दोन बादशहा एक होतात तो देश किती दैवशाली होय! ज्या काळात दोन करार एकरूप होतात तो काल किती पवित्र होय! पुत्र बादशहा आहे आणि बापही बादशहा आहे! या देशाचे केवढे हे वैभव की दोन बादशहा येथे एक झाले आहेत! जगावर सत्ता गाजविण्यासाठी दोन शक्तिशाली बादशहा एक झाले आहेत! एक काळाचा सहाय्यकर्ता सुलतान महमूद असून, त्याचा अधिकार राज्याच्या चारी दिशांना व्यापणारा आहे, तर दुसरा बादशहा साऱ्या जगाचे भूषण असणारा कैकुबाद असून, त्याच्या अधिसत्तेखाली ईरान व तूरान एक झाले आहेत."

नंतरच्या काळात, कैकुबादच्या इच्छेनुरूप *किरान उस् सआदैन** हे कथाकाव्य *(मसनवी)* त्यांनी लिहिले तेव्हा त्यातही हा प्रसंग वर्णिला आहे. आपला आश्रयदाता हातिम खान याच्या जवळ अयोध्या येथे खुस्रो राहिले व तेथून परतल्यावर सहा महिन्यांच्या आत हे कथाकाव्य पूर्ण झाले. खुस्रोच्या म्हणण्याप्रमाणे या धड्यात त्यांनी 13944 शेर रचले होते. यावेळी त्यांचे वय 36 वर्षांचे होते.

या मसनवीमध्येच खुस्रोची एक गझलही समाविष्ट आहे. दिल्लीच्या रूपवतींचे तीत त्यांनी असे संस्मरण केले आहे :

"दिल्ली! आणि दिल्लीच्या त्या विविध प्रकारची वस्त्रे मस्तकापर्यंत धारण करणाऱ्या तरुण ललना! ज्या वाटेने त्या जातात ती वाट हलत्या डोलत्या फुलांनी बहरून जाते. त्या पुढे चालत असतात आणि डोळ्यातून रक्ताचे अश्रू ढाळणारे त्यांचे प्रियकर त्यांचा पाठलाग करीत असतात. या हिंदू सुंदरींनी मुसलमानांना सूर्योपासक करून टाकले आहे."*

कैकुबादने अवघी तीन वर्षे राजसिंहासन उपभोगले. मात्र कुतुबुद्दीन ऐबकने ज्याचा पाया घातला व शम्सुद्दीन अंल्तमशने त्याला बळकटी आणली त्या गुलाम वंशाच्या राजसत्तेला ही तीन वर्षे विघातक ठरली. मलिक निजामुद्दीनच्या कारस्थानांची स्वतः कैकुबादला कल्पना आली खरी. पण तोवर धनुष्यातून बाण निसटला होता. मलिक निजामुद्दीनच्या तावडीतून आपली कशी तरी सुटका करून घेऊन कैकुबादने मलिक जलालुद्दीन खिलजी यास *आरिजे मुमालिक* (श्रेष्ठ अधिकारपद) हे पद सांभाळण्यासाठी निमंत्रित केले. यावेळी कैकुबादची प्रकृती अगदी ढासळली होती व तो अंथरुणाला खिळला होता. याच वेळी दोन गटांत चकमक उडून बरेच रक्त सांडले व जलालुद्दीन खिलजीला अनुकूल असणाऱ्या गटांचा विजय झाला. जलालुद्दीन खिलजी दिल्लीच्या तख्तावर आरूढ झाला, याच अवधीत हतबल आणि दुर्बल झालेल्या कैकुबादचा कोणी तरी वध केला. अशा तऱ्हेने गुलाम वंशाची सत्ता संपुष्टात आली आणि सत्तेची सूत्रे खिलजींच्या हाती आली.

---

* *किरान-उस्-सआदैन,* पृ. 29

# दोन

कैकुबादला ज्या परिस्थितीत मृत्यू आला ती तशी असाधारण म्हणता येत नाही, मलिक निजामुद्दीनच्या तावडीतून सुटल्यावर ज्या अलाउद्दीन खिलजीला कैकुबादने आपला श्रेष्ठ वजीर म्हणून जबाबदारी सांभाळण्यास निमंत्रित केले होते, त्यानेच आता आपण बादशहा झाल्याचे घोषित केले. सिंहासनारूढ होताना स्वतः जलालुद्दीन सत्तर वर्षांचा होता. या वयोवृद्ध बादशहाने राज्यातील गैरव्यवस्था समूळ उपटून काढण्याच्या निश्चयाने सत्तेची सूत्रे हाती घेतली. जलालुद्दीन मृदु अंतःकरणाचा, धैर्यशाली, क्षमाशील आणि उदार होता. याव्यतिरिक्त, काव्य आणि साहित्याचा तो आश्रयदाताही होता. तो स्वतः देखील कधी कधी काव्यरचना करीत असे.

सुदैवाने शाही दरबारचे वातावरण खुस्रोला अत्यंत अनुकूल होते. बादशहाच्या जवळच्या परिवारात त्यांनी प्रवेश मिळविला व त्याच्या हृदयातच घर केले. बादशहा त्याच्यावर इतका संतुष्ट झाला की, त्याने खुस्रोला *मसहफदार* हे अधिकारपद आणि अमीरकीची शाही वस्त्रे बहाल केली. शिवाय वर्षाला बाराशे तंक्याचे वेतनही नेमून दिले. पुन्हा एकदा खुस्रोला आपल्या काव्यशक्तीच्या आविष्काराला मोकळे वातावरण लाभले. प्रत्येकजण त्यांची प्रशंसा करीत असे. परिणामतः त्यांच्या प्रतिभेला पंख फुटू लागले. दरबारातील गायक व नर्तिका खुस्रोच्या गजला गात असत आणि सर्व जण त्यांचा आनंद लुटीत असत. "एकीकडे सुंदर साकी मद्याचे प्याले भरून देत आणि रूपवती नर्तिका आपले नृत्यगान कौशल्य प्रकट करीत असत, तर दुसरीकडे खुस्रोच्या गजला गायल्या जात. अशा स्वर्गीय महफलीत जीवन-मृतांनाही नवे जीवन मिळत असे व दुःखी हृदये आनंदाने धुंद होत."*

आतापर्यंत खुस्रोने आपल्या आयुष्याचे अडतीस वसंत पाहिले होते आणि या काळात त्याचे नशीब जोरदार होते. आधी सांगितल्याप्रमाणे जलालुद्दीन अत्यंत मृदु अंतःकरणाचा होता हे खरे, पण इतरांच्या प्रमादांकडे डोळेझाक करण्याच्या त्याच्या वृत्तीचा त्याला काही फायदा झाला नाही. मूठभर लोकांना प्रवाहाची दिशा बदलणे शक्य नव्हते. बादशहाच्या विरुद्ध कटकारस्थाने शिजतच होती. परंतु तो तिकडे दुर्लक्ष करीत

---

*खुस्रोचा समकालीन इतिहासकार झियाउद्दीन बर्नी याचे हे उद्‌गार आहेत. (डॉ. वहीद मिर्जा यांच्या *'अमीर खुस्रो : चरित्र आणि कर्तृत्व'* या इंग्रजी ग्रंथातून)

होता. परिणामतः अशी माणसे आपले वर्तन सुधारण्याऐवजी परिस्थितीचा गैरफायदा घेत असत. या बाबतीत परिस्थिती इतकी बिघडली होती की, बादशहाचे स्नेही आणि नातलगदेखील त्याच्याविरुद्ध कारस्थाने करू लागले होते. जलालुद्दीन केवळ सहा वर्षे बादशहा राहिला. आपला पुतण्या आणि जावई अलाउद्दीन खिलजी यांच्या विश्वासघाताला तो बळी पडला. आश्चर्य असे की, याच अलाउद्दीनला तो आपल्या मुलाप्रमाणे मानीत असे. अलाउद्दीनला बादशहाने अयोध्या आणि कढा या प्रांतांचा सर्वाधिकारी नेमले होते त्यानेच दोन बदमाशांच्या हस्ते बादशहाचा वध करविला. जलालुद्दीनचा विश्वासू कारभारी अहमदचाप यास कटाचा सुगावा लागला होता व तसे त्याने बादशहाला सावध करण्याचा प्रयत्नही केला होता. परंतु बादशहाचा अलाउद्दीनवर एवढा विश्वास होता की अहमदचाप याचा सल्ला त्याने मानला नाही. जलालुद्दीन मारला गेला आणि प्रजाजनांचा क्रोधाग्नी शांत करण्यासाठी व त्याच्या या दुष्ट कृत्याविरुद्ध उठू पाहणाऱ्या अमीरांना डांबून ठेवण्यासाठी एखाद्या विजयी वीराच्या थाटात सोन्या-चांदीचा वर्षाव करीत कसलीही आडकाठी न येता अलाउद्दीनने दिल्लीत प्रवेश केला.

याप्रसंगीही खुस्रोने मारेकरी म्हणून नव्हे, तर बादशहा म्हणून अलाउद्दीनची प्रशंसागीते गायली आहेत. आपल्या आश्रयदात्याच्या वधाचे दुःख त्यांनी व्यक्त केलेले दिसत नाही. अन्य दिल्लीकरांच्या पावलावर पाऊल ठेवूनच जणू ते चालत होते. अलाउद्दीनला उद्देशून रचलेल्या आपल्या एका मसनवीत प्रारंभ काळात त्याच्यावर आपण केलेल्या स्तुतिवर्षावाचा खुस्रोने असा उल्लेख केला आहे :

"माझ्या समुद्रसमान उदार हृदयाने राज्यारोहणाच्या उत्सवात तुझ्यावर सर्वांच्या आधी मोती उधळले नाहीत काय? माझ्या शुभसूचक शब्दांचा प्रभाव तर बघ की, दैवाने तुला दिल्लीचे तख्त प्रदान केले."

एकंदरीत अमीर खुस्रोच्या *दीवान* (काव्यसंग्रह) मध्ये असे अनेक कसीदे समविष्ट आहेत, जे जलालुद्दीन खिलजीच्या प्रशंसेत रचले गेले आहेत. त्यांचा एक कसीदा तर श्रेष्ठ कसीदाकार कवी जहीरुद्दीन फारावी याने सुलतान कजल-उल-रसालवर रचलेल्या कसीद्याची आठवण करून देणारा आहे. खुस्रोच्या कसीद्यातील काही शेर (अनुवाद रुपात) पुढीलप्रमाणे आहेत :

"सुलतान जलालुद्दीनला सिंहासनावर चढण्यासाठी सप्त आकाशांच्या पायऱ्या सिद्ध असतात. फिरोजशाहचे व्यक्तित्व प्रत्येक क्षणी पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत सुख आणि शांतीच्या उच्चरवाने उद्घोष करीत असते.

त्याच्या सैन्याच्या संचलनाने उठलेली धूळ जेव्हा आकाशाला भिडते तेव्हा आकाशातील चंद्रदेखील त्याच्यापुढे पृथ्वीपर्यंत लीन होतो.

देव करो आणि तुझी सत्ता सदैव टिकून राहो व तुला अशी सत्ता लाभो की, आकाशावरही तुझा अधिकार प्रस्थापित होवो.

तुला असे सुदैव लाभावे की तुझ्या पवित्र चेहऱ्यावर सतत सत्तेचा, जादूचा शुभसंदेश प्रगटत राहावा.'' आणखी एका कसीद्यात ते म्हणतात :

''हे शहेनशाह! खुस्रोची कला केसाप्रमाणे सूक्ष्म आहे. तुझी स्तुती करताना तो कशी गुंतागुंत निर्माण करतो ते पाहा. काव्यरचनेच्या परीक्षेच्यावेळी इतरांना तात्काळ प्रत्युत्तर देताना काव्यातील यमके या तज्ज्ञाला झोंबत असतात. तू पाहा! मी त्यांना असे गिळून टाकले की, चविष्टपणामुळे जे बाहेर रेंगाळतात ते अस्वस्थ होऊन जातात. माझ्या काव्यशैलीचा लोक हेवा करीत आहेत, जणू कोळसा मोत्यांच्या हारावर चिडत आहे.

तुझ्यासाठी प्रार्थना करताना आकाशदेखील विनीत होते. तुझ्या सत्तेचा पट इतका दीर्घकाळ पसरलेला राहावा, की लोकांनी म्हणावे, काळाने अंतिम हितासाठीच (कयामत) ही बिछायत टाकलेली आहे.''

सुलतान जलालुद्दीनचा कुटिलतेने वध करण्यात आल्यानंतर अलाउद्दीन खिलजी हिंदुस्थानचा निर्विरोध सत्ताधीश झाला. आपल्या राजवटीची प्रारंभीची वर्षे त्याने आपल्या राज्याचा विस्तार करण्यात व आजवर न जिंकण्यात आलेले प्रदेश जिंकण्यात घालविली. नवे नवे प्रदेश जिंकण्याचे त्याला इतके वेड होते की, सिकंदरप्रमाणे सर्व पृथ्वी पादाक्रांत करण्याचा त्यानेही दृढ निश्चय केला. अशा कल्पनेच्या साम्राज्यात वावरण्याचा काय परिणाम होतो ते सर्वांना ठाऊकच आहे. आपल्या निश्चयाच्या पूर्णतेवर जोवर त्याने लक्ष केन्द्रित केले तोवर त्याच्या राज्याची अंतर्गत स्थिती सतत बिघडत गेली. बादशहाला या खेदजनक परिस्थितीच्या संदर्भात योग्य सल्ला देण्याचे धैर्य कोणातच नव्हते. तो कोणाचे काहीच ऐकत नव्हता. एक समकालीन इतिहासकार झियाउद्दीन बर्नी *(तारीखे फिरोजशाही)* याने यासंदर्भात असे म्हटले आहे :

''आपल्या राजवटीच्या तिसऱ्या वर्षात विलासात मग्न राहणे, मेजवान्या देणे आणि उत्सव साजरे करणे याव्यतिरिक्त अलाउद्दीन काही करीत नव्हता...सगळीकडून विजयाच्या वार्ता त्याला मिळत होत्या. प्रत्येक वर्षी त्याला दोन किंवा तीन अपत्यांचा लाभ होत होता. राज्याचा कारभार समाधानकारकपणे चालला होता. खजिना भरलेला होता. हिरे, माणके आणि मोत्यांची भरलेली तबके व पेट्या दररोज त्याच्या निरीक्षणार्थ सादर केल्या जात होत्या. त्याच्या तबेल्यात अनेक हत्ती व राजधानीत आणि तिच्या परिसरात सत्तर हजार घोडे होते. या सुखसंपत्तीने व वैभवाने त्याला धुंद करून टाकले, आटोक्यात न येऊ शकणाऱ्या अनंत इच्छा आणि उत्तुंग उद्दिष्टे त्याच्या मनात जन्म घेत. तो अशा कल्पनांत गुरफटून जात असे की, ज्या त्याच्या पूर्वी कोणाही बादशहाला कधी सुचल्या नसतील. या अवास्तव कल्पना, वस्तुस्थितीचे अज्ञान आणि विक्षिप्तपणामुळे त्याने आपल्या मनाचा तोल गमावला होता. तो अगदी अशक्य अशा योजना आखीत होता व वेड्याप्रमाणे अनेक आकांक्षा हृदयात बाळगून होता. तो एक अशिक्षित माणूस

होता आणि शिक्षित माणसांशी तो कसलाही संबंध ठेवीत नव्हता. त्याला साधं पत्रही लिहिता किंवा वाचता येत नव्हते. तो स्वभावाने तापट, जिद्दी आणि पाषाणहृदयी होता. जग त्याला गालातल्या गालात हसत असे. पण तो मोठा दैवशाली होता. त्याच्या योजना सामान्यतः यशस्वी ठरत असत. परिणामतः तो अधिकच जुलमी आणि निर्दय झाला. आपण स्वतः पैगंबराप्रमाणे व्हावे व एका नव्या धर्माचा प्रवर्तक बनावे असे स्वप्न तो उराशी बाळगून होता. दिल्लीत आपला एक प्रतिनिधी नेमण्याचा तो विचार करीत होता आणि आपल्या मद्यप्राशनाच्या मैफलीत तो सांगत असे, की मी सिकंदराप्रमाणे नवीन विजयांच्या शोधात निघेन व सारे जग पादाक्रांत करीन. शुक्रवारच्या नमाजामध्ये आपली बिरुदावली घोषित केली जावी, अशी सार्वत्रिक प्रथा त्याने सुरू केली आणि नाण्यांवर व शिलालेखांतून *सिकंदरेसानी* (दुसरा सिकंदर) असे ठसवून आणि कोरवून घेतले."

या योजना आणि कल्पना इतरांच्या दृष्टीने कितीही अशक्य आणि असंभाव्य असल्या तरी त्यांनीच आपल्या कारकीर्दीचा प्रारंभ करावा. अशी अलाउद्दीनची इच्छा होती कारण जगज्जेता म्हणून भविष्यात आपली कीर्ती सर्वत्र व्हावी ही त्याची आकांक्षा होती. यामध्ये जे धोके दडलेले होते ते अगदी स्पष्ट होते. कसेही असो, जगात चांगल्या माणसांचे दुर्भिक्ष्य नसते आणि कधी कधी चांगुलपणाच्या एका आघातातच वाईट मनुष्यदेखील बदलल्याचे व त्याने इतिहासाच्या प्रवाहाला निराळे वळण लावल्याचे दिसून येते. अलाउद्दीनचेही असेच झाले. आपला एकाधिकार गाजविणारा आणि मनःपूत वागणारा अलाउद्दीन एका शहाण्या माणसाच्या सांगण्यावरून पार बदलून गेला. अकलेने त्याला साथ दिली. या जाणत्या माणसाने त्याला सल्ला दिला, की जगज्जेता बनण्याच्या प्रयत्नात आपला वेळ आणि आपली शक्ती वाया घालविण्याऐवजी त्याने आपल्या राज्यांतर्गत भानगडी मिटवाव्यात, मंगोलांना मुलतानची वाट बंद करावी आणि मद्यप्राशन व विलासप्रियता सोडून द्यावी. बादशहाच्या मनावर या उपदेशाचा अनुकूल परिणाम झाला आणि आपल्या प्रजेच्या सामाजिक, सांस्कृतिक व आर्थिक जीवनात सुधारणा करण्यासाठी तो मनोभावे झटू लागला. राज्यातील विरोधकांचे बरेच उठाव त्याने कठोरपणे मोडून काढले आणि बंडखोरांना कठोर शिक्षा केल्या. मद्यावर बंदी घालण्यात आली आणि अशा तऱ्हेच्या विलासी महफिली व आनंदोत्सवांवर कायद्याचे नियंत्रण लावले गेले.

झियाउद्दीन बर्नीनेच या संदर्भात आपल्या *तारीखे फिरोजशाही* मध्ये म्हटले आहे : "बादशहाने आज्ञा केली, की ज्या कोणत्या गावावर इनाम म्हणून अथवा धर्मादाय म्हणून कोणाचा मालकी हक्क असेल तो लेखणीच्या एका फटकाऱ्याने सरकारजमा करण्यात यावा. या ना त्या बहाण्याने लोकांकडून बळजबरीने पैसा गोळा केला जात होता. शेवटी अशी स्थिती निर्माण झाली की मलिक, अमीर, मुलतानी व्यापारी, सरकारी अधिकारी आणि सावकार यांच्याखेरीज इतर कोणाकडे एक दिडकी, नगदी

शिल्लक उरली नाही. ही जप्ती इतकी कडक होती की काही हजार तंक्यापेक्षा अधिक रकमेचे देशातील सर्व वजीफे (नेमणुका), इनामी जमिनी व अन्य प्रकारची सर्व इनामे सरकारजमा करण्यात आली. प्रजाजन आपल्या उपजीविकेच्या शोधातच एवढे गढून गेले होते, की बंडाचे नावही कोणाच्या तोंडून निघत नव्हते.''

अलाउद्दीनने अशा रीतीने एक नैतिक पद्धती निश्चित केली. वाईटाच्या मुळावरच घाव घातला आणि आपल्या राज्यात सर्वत्र शांतता, सुव्यवस्था आणि सुस्थिरता यांची ग्वाही दिली. आजच्या काळातील इतिहासाच्या अभ्यासकाला या गोष्टी अवाजवी वाटणे शक्य आहे. त्याच्या दृष्टीने अलाउद्दीन एक असा अडाणी व जुलमी बादशहा ठरण्याची शक्यता आहे, की ज्याच्या मुखातून निघालेला प्रत्येक शब्द लिखित कायद्याच्या अभावी कायद्याचे रूप धारण करीत असे. परंतु तत्कालीन परिस्थितीचे खोलात जाऊन सर्वांगीण अवलोकन केले, तर अलाउद्दीनचे धोरण समर्थनीय वाटू लागते. त्याने हेरगिरीची अशी पद्धती निर्माण केली होती, की लहानसहान गोष्टीही त्याला सविस्तर कळत असत. इतिहासकार सांगतात, की लोक संकेतांनी बोलत असत. देशाची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी अलाउद्दीनने टाकलेली पावले म्हणजे त्याचे स्वतंत्र कर्तृत्व म्हटले पाहिजे. सौदागर, व्यापारी आणि किरकोळ विक्री करणारे दुकानदार यांना एवढा वचक होता, की वजनात लबाडी करण्याची कल्पना कोणाच्या स्वप्नातही येऊ शकत नव्हती. प्रत्येक मालाची, प्रत्येक वस्तूची अगदी गुलाम आणि दासींचीसुद्धा किंमत ठरलेली असे. गैरवर्तन करणाऱ्या आणि कायदा न पाळणाऱ्यासाठी बादशहाच्या मनात दयेचा लवलेशही नसे आणि त्यांना कठोर शिक्षा देताना त्याच्या मनाला कधी टोचणी लागत नसे. जोपर्यंत तो जिवंत होता तोपर्यत त्याच्या या सुधारणांच्या धोरणावर पूर्ण अंमल होत राहिला.

या वर्णनावरून हे स्पष्ट दिसून येते, की अलाउद्दीन कलावंत, कवी, लेखक आणि विद्वानांना प्रोत्साहन देत नव्हता. आपल्या राज्यकारभारासंबंधी उपयुक्त सल्ला देण्यासाठी म्हणून 'बयाना' येथील काजीला त्याने मुद्दाम बोलावून घेतले होते. त्याच्याशी बोलत असताना एकदा त्याने स्वतःच म्हटले :

''अहो विद्वान! आपण फार शिकलेसवरले आहात हे खरे, पण आपणास जगाचा अनुभव नाही. मी एक निरक्षर अडाणी माणूस आहे परंतु मी खूप काही बघितले आहे.'' इतिहासात अलाउद्दीनच्या राजवटीतील दहा आश्चर्ये वर्णन करण्यात आली आहेत. यात 'आश्चर्याचे आश्चर्य' म्हटले गेलेले शेवटचे आश्चर्य असे, की अलाउद्दीनचे दुर्लक्ष असूनही विद्वान, सूफी, कवी, संगीतकार व विविध कलांचे जाणते कलावंत त्याकाळी मोठ्या संख्येने अस्तित्वात होते. जेव्हा या लांबलचक यादीवर आम्ही दृष्टिक्षेप टाकतो तेव्हा आमचा कवी अमीर खुस्रो याचे स्थान त्या यादीच्या शीर्षस्थानी असलेले दिसून येते. त्याच्यानंतर त्याचा मित्र अमीर हसन सिजझी याचा क्रम आढळतो. इतर कवी आणि विद्वानांत सद्रुद्दीन आली, फखरुद्दीन कवास, हमीदुद्दीन राजा, मौलाना

आरिफ अब्दुलहकीम आणि शहाबुद्दीन यांचा समावेश होता. खुस्रो अलाउद्दीनच्या सेवेत दाखल झाले होते आणि एक हजार तंक्यांची वार्षिक नेमणूक त्यांना मिळालेली होती. अलाउद्दीन खुस्रोला कवी म्हणून मानीत असला तरी यापूर्वी त्यांना जो मानमरातब लाभला होता त्याचा आता मागमूसही नव्हता. तरीही अलाउद्दीनची एकवीस वर्षांची राजवट खुस्रोच्या कलागुणांना पोषक ठरल्याचे दिसून येते. याच काळात त्यांनी आपल्या *पंज गंज* या काव्यसंग्रहाची रचना केली. मौलाना निजामी गंजवी यांच्या *खम्साच्या* धर्तीवर त्यांनी ही रचना केली होती. *खजामनउल्-फुतूह* (विजयांचा खजिना) मध्ये त्यांनी अलाउद्दीनच्या मोहिमांचे आणि विजयांचे सविस्तर वर्णन केले आहे. खुस्रोला पुरविण्यात आलेल्या सरकारी माहितीवर या ऐतिहासिक काव्याची उभारणी झालेली असली तरी अलाउद्दीनच्या सर्व विजयी मोहिमांचा त्यात समावेश नाही. तत्कालीन जीवनावर मात्र या काव्याने बराच प्रकाश टाकलेला आहे. *देवलरानी/खिजरखान* ही मसनवी याच वेळी लिहून पूर्ण झाली. अलाउद्दीनचा मुलगा खिज्रखान याच्या प्रेमकथेवर हे कथाकाव्य रचण्यात आले आहे. बहुधा याचवेळी *बकियत-उल्-नकिया* या आपल्या तिसऱ्या दीवानाचे संकलन त्यांनी पूर्ण केले. *मतूल-उल्-अन्वर, शीरी खुस्रो, आइनये-सिकंदरी* आणि *हश्त बेहेश्त* या पाच रचनांचा समूह म्हणजे *पंज-गंज*. यातील एकूण शेरांची संख्या अठरा हजार असून, केवळ दोन वर्षांच्या अल्प कालावधीतही रचना पूर्ण झाली आहे. *पंज गंजची* ही मालिका सुलतान अलाउद्दीनला अर्पण करण्यात आली असून, प्रथेप्रमाणे बादशहाची स्तुतीही येथे केलेली आहे. मात्र खुस्रोने केवळ स्तुतीवर समाधान मानलेले नाही. ज्याला मतभेद आणि विरोध मुळीच होत नसे, अशा अलाउद्दीनला त्याने हितोपदेशही केला आहे. बादशहाची स्तुती करताना ते म्हणतात :

> "दुसरा जमशीद, (इराणचा प्रसिद्ध बादशहा) इहलोकाचा आणि धर्माचा मूर्तिमंत अभिमान, आकाश याचा राजमुकुट असून, सूर्य म्हणजे याची राजमुद्रा होय.
>
> जगाचा बादशहा, मोहम्मद शाह आपल्या कृष्णछत्राखाली जगाला आसरा देत आहे. चंद्राने याला आपले प्रकाशमान आकाश म्हटले तर धर्माने त्या आपले मूर्तिमंत वैभव, हे अभिधान दिले. सिंहासन प्रदान करणारा व राजमुकुट हिरावून घेणारा असा हा बादशहा, अरब ते अजम (इराण) सर्वांपासून खंडणी वसूल करीत आहे.
>
> याचा झेंडा आकाशाला भिडलेला असून, सूर्यालाही आपल्याखाली आश्रय देत आहे."*

अशा रीतीने ते बादशहाची स्तुती करीत असले तरी कवी म्हणून असलेले आपले कर्तव्य विसरत नाहीत. बादशहाला ते असा सल्ला देतात :

---

**हश्त बेहश्त-मसनवी* : अमीर खुस्रो

"देवाने तुला राजसिंहासन दिले आहे आणि आकाशापासून पाताळापर्यंतचे राज्य तुझ्या स्वाधीन केले आहे. तेव्हा तू आपल्या या राजसत्तेच्या बळावर सर्व प्रजेला संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न कर.

तू पीडितांना न्याय दे व जुलूम करणाऱ्यांना शिक्षा कर. वाटेतील काटे दूर कर आणि काटे उखडून फेकणारांना सुखी व आनंदी ठेव,

तू हत्तींना चारा दे. पण मुंगीकडे दुर्लक्ष करू नकोस. तू आपल्या उदारतेने व दातृत्वाने जगाला समाधानी ठेव म्हणजे तूही आनंदित राहशील व देवही तुझ्यावर प्रसन्न राहील. काही निवडक विशेष व्यक्तींचा गौरव करून तू जेव्हा त्यांच्यावर आपल्या दयेचा व दातृत्वाचा वर्षाव करशील, तेव्हा उपाशीपोटी एखाद्या कोपऱ्यात रात्र काढणाऱ्या फकिराचीही आठवण असू दे." *(हश्त बेहश्त मसनवी*-खुस्रो)

अलाउद्दीनसारख्या सर्व सत्ताधीशाला खुस्रोने ज्या निर्भीडपणे व स्पष्टपणे हा हितोपदेश केलेला आहे, त्यावरून त्यांच्या नैतिक धैर्याची जशी कल्पना येते तशीच राजाकडे बघण्याचा त्यांचा दृष्टिकोनही सुस्पष्टपणे कळून येतो.

अलाउद्दीनचा पूर्वाधिकारी जलालुद्दीन खिलजी याने खुस्रोला *'मसहफदारी'* बहाल केली होती, याचा उल्लेख आधी आलेलाच आहे. अलाउद्दीनने त्यांना त्या पदापासून वंचित केले. परिणामतः त्यांचे दैनंदिन जीवन आर्थिक अडचणींनी व चिंतेने ग्रस्त झाले. बादशहाच्या प्रशंसापर रचलेल्या आपल्या एका कसीद्यात या संबंधीची आपली भूमिका अशी मांडली आहे :

"हे बादशहा, तुझ्याकडे आपले मुख वळवून आकाशाने सांगितले, की बादशहाच्या दातृत्वाचा इच्छुक असा मी एक सेवक आहे.

बादशहांनी माझ्याकडे 'मसहफदारी'ची सेवा दिली, की माझ्या प्रार्थनेच्या ताईताने बादशहाच्या शरीराचे रक्षण व्हावे. माझ्या नशिबाने या बादशहाच्या राजवटीचे भाग्य मला लाभले असताना माझी अशी इच्छा आहे, की ही दौलत मला पुन्हा मिळावी. मी जिवंत असेपर्यंत बादशहाने मला चांदी-सोने दिले तरच उत्तम होय, नसता मृत्यूनंतर मला त्याचा काय उपयोग? खुस्रो आपल्या काव्याद्वारे बादशहाला जे चिरंजीवन देत आहे त्याचा हेतू हाच आहे, की त्याचे नाव *कयामत* (जगाच्या अंतापर्यंत टिकून राहावे)." (*बकियतुलनकिया*—अमीर खुस्रो)

*'एजाजे खुस्रवी'* ही खुस्रोची प्रचंड गद्यरचना होय; तिची निर्मितीदेखील अलाउद्दीनच्या राजवटीतच झालेली आहे. या गद्यकृतीत सर्वसामान्य लोकांच्या स्थितीचे वर्णन करताना ते लिहितात :

"एकीकडे चेंगीझखानाच्या पर्वताकार फौजांना त्याने आपल्या प्रबल शक्तीने जेहूंच्या (इराणमधील नदी) पलीकडच्या काठावर ढकलले, तर दुसरीकडे तुर्कांच्या सैन्याला आपल्या हत्तींच्या पायदळी तुडविण्याऱ्या हिंदुस्थानातील बलवान अमिरांना

हत्ती व संपत्ती देण्यास भाग पाडले. इतकेच नव्हे, तर त्यांच्यापैकी जे अजूनही शरण आले नव्हते त्यांना असे कुचलण्यात आले, की तेलाच्या बादल्यांप्रमाणे त्यांची मस्तके हत्तींच्या पायातळी फेकण्यात आली व या तेलानेच हत्तींच्या भेगाळलेल्या पायांची त्वचा मऊ करण्यात आली. न्याय आणि प्रजेच्या कल्याणासाठी त्याने असे कायदे केले आहेत, की भविष्यातील घटनांचे दर्शन घडवू शकणाऱ्या *आइनि सिकंदर*मध्ये त्यांची प्रतिमा दिसत नाही किंवा जगातील कोणतीही वस्तू ज्यात बघता येई त्या झमझमा मशीदमध्ये देखील त्यांचा आढळ होत नाही. जीवनाधार असलेले धान्य स्वस्त असावे म्हणून आपल्या समतोल न्याय पद्धतीस अनुसरून त्याने असे धोरण अंमलात आणले आहे, की जरी स्वैर भटकणाऱ्या मेघांनी आपल्या कपाळीचा घाम अनेक वर्षे गाळला नाही, वारे वाहिले नाहीत, धरणीने हिरवे कोंब उगवले नाहीत व तापणाऱ्या सूर्याने पिके परिपक्व केली नाहीत तरी आपल्या सर्वसामान्य प्रजाजनांना पुरेसा धान्यपुरवठा करण्याची क्षमता त्याच्या धान्य भांडारात आहे. लोकांच्या गरजेच्या अन्य वस्तूदेखील, मग तेलास गंधक असो, की पांढरे माणिक (या दोन्ही मौल्यवान पण काल्पनिक) त्याने अत्यंत स्वस्त करून टाकल्या आहेत आणि पिवळे अंबर (एक सुगंधी द्रव्य) व लाल धान्य यांपेक्षाही सहजोपलब्ध करून टाकल्या आहेत. शिवाय असे, की अत्यंत प्रिय असणारी व इच्छांचे अमृतच असलेली संपत्ती आपल्या मौल्यवान बक्षिसांनी विपुल दानाने त्याने इतकी स्वस्त करून टाकली आहे, की कोणत्याही वस्तूच्या वाढीव किमतीचे कुणालाही ओझे वाटेनासे झाले आहे. परिणामतः त्याच्या संपूर्ण राज्यात सुख आणि समृद्धी नांदत आहे. सूर्यापासून सावली दूर पळावी तसे डाकू संपत्तीपासून दूर पळत आहेत. दिवा जसा सदैव अंधार नाहीसा करीत असतो तसा न्याय जुलमांचे समूळ उच्चाटन करण्यात मग्न आहे. लहानग्या, निर्बल मुंगीच्या वाटेत गर्वाने पाय ठेवण्याची बलवान हत्तीचीदेखील हिंमत नाही आणि भुकेल्या वाघातदेखील लंगडत्या हरिणाला पाहून हसण्याचे धैर्य नाही."*

सुलतान अलाउद्दीनच्या वैभवशाली व शांततापूर्ण राजवटींसंबंधी खुस्रोने केलेली विधाने अतिशयोक्त वाटतात खरी, पण झियाउद्दीन बर्नीच्या उपयुक्त विधानांच्या आधारे खुस्रोला या आरोपातून मुक्त करता येते. बर्नीने निराळ्या शब्दात हेच सांगितले आहे.

इ. स. 1316 मध्ये शोथ या जलसंचयाच्या आजाराने अलाउद्दीन खिलजीला मृत्यू आला. त्याने वीस वर्षे निष्कंटक व यशस्वीपणे राज्य केले. अशा कठोर आणि कडक राजवटीच्या प्रतिकूल प्रतिक्रिया होणेही अपरिहार्यच होते. एका हलक्या कुळातील

---

* डॉ. वहीद मिर्जा : *अमीर खुस्रो—चरित्र आणि कर्तृत्व* (इंग्रजी)

धर्मांतरित मुसलमान असलेल्या मलिक काफूरने बादशहाचा संपूर्ण विश्वास संपादन केला होता. त्याच्याच चिथावणीवरून बादशहाने आपला मुलगा खिजरखान यास कैदेत टाकले होते. आपली बहादुरी आणि यशस्वी मोहीम यांच्या बळावर मलिक काफूर, बादशहाच्या अधिकच जवळ आला होता. बादशहा रुग्णशय्येवर असताना त्याला एक *फर्मान* (शाही आदेश) काढावयास लावून मलिक काफूरने खिजरखानाचा राजसिंहासनावरील अधिकार नष्ट केला होता आणि त्याच्याऐवजी त्याच्या अल्पवयीन मुलास युवराजपद देण्यात आले होते. बादशहाच्या मृत्यूनंतर लागलीच मलिक काफूरने हे फर्मान अमिरांना दाखविले व अल्पवयीन शाहजादा शहाबुद्दीनला सिंहासनारूढ करण्यात आले. या लबाड कोल्ह्याने मलिक काफूरने आपल्या स्वामीच्या मुलाविरुद्ध दगाबाजीचे व आज्ञाभंगाचे पहिले कृत्य जर कोणते केले असेल, तर ते खिजरखानाचे डोळे फोडून त्याला अंधळा बनविण्याचे! त्यानंतर राजकुलांतील ज्यांना म्हणून शाहीतख्तावर हक्क मागणे शक्य होते, त्या सर्व राजपुत्रांचा त्याने निर्दयपणे वध केला. मृत बादशहाची विधवा राणी, मलिका-इ-जहान हिची सर्व मिळकत, संपत्ती, जडजवाहीर, सोने-चांदी आणि इतर मौल्यवान सामान हिरावून घेण्यात आले. राजकुलातील एकटा मुबारकशाह खिलजी तेवढा पळून जाऊन आपला जीव वाचवू शकला. झियाउद्दीन बर्नीने आपल्या *तारीखे फिरोजशाहीत* म्हटले आहे :

"अलाउद्दीनने काही वर्षे यशस्वीपणे राज्य केले आणि त्याच्या इच्छेप्रमाणे उत्कर्ष होत गेला हे खरे असले तरी, आणि त्याच्या बायका होत्या, मुलं होती, कुटुंबीय व संबंधी होते, संपत्ती आणि वैभव होते तरीदेखील आपला आश्रयदाता आणि पालक असलेल्या जलालुद्दीनच्या खुनाच्या परतफेडीपासून तो वाचू शकला नाही. निरपराध लोकांचे रक्त सांडण्यात त्याने *फरओन*वरही (इजिप्तचा बादशहा) आघाडी मारली होती. शेवटी नशिबाने त्याच्या मार्गात एक असा दगाबाज आणून उभा केला, की ज्याने त्याच्या कुलाचा नाश केला. जो सूड त्याच्यावर उगविला गेला, त्याचे काफिरांच्या भूमीत दुसरे उदाहरण सापडत नाही."

भीती, धास्ती, खून आणि विध्वंस यांचा हा नंगानाच काही महिने चालू राहिला आणि दगाबाज मलिक काफूरला शेवटी आपल्या कृत्यांचे प्रायश्चित भोगावे लागले. आपल्या शयनगृहातच त्याचा वध करण्यात आला. मुबारकशाह हा अलाउद्दीनचा एकच मुलगा आता जिवंत होता. त्याला राज्यावर बसविण्यात आले. हा सुंदर तरुण आपल्या बापाच्या पावलांवर पाऊल टाकून चालेल व राज्यात शांतता आणि सुव्यवस्था निर्माण करील अशी रास्त अपेक्षा त्याच्याकडून बाळगण्यात येत होती. पण त्याने सर्वतोपरी अपेक्षाभंग केला. शाही दरबाराचे मद्यालयात रुपांतर झाले. मद्यप्राशन आणि रंगढंगांवर अलाउद्दीनने संपूर्ण बंदी घातलेली होती पण आता स्वतंत्र बादशहा आणि त्याचे दरबारी अमीर या गोष्टींच्या इतके आधीन झाले, की त्यांना लोकलज्जेची आणि औचित्याची

जाणीवच राहिली नाही. अलाउद्दीनच्या राजवटीचे विशेष म्हणून ओळखल्या जाणाऱ्या, औचित्य, संयम आणि समतोल यांचा आता मागमूसही उरला नाही. आपल्या बापाप्रमाणे मुबारकशाहच्यादेखील खुस्रोखान नावाचा एकजण अत्यंत प्रिय होता आणि खऱ्या अर्थाने तोच राज्यभर सत्ता गाजवीत होता. व रमजानचे रोजे (उपवास) राखले जात होते व नमाज पढली जात होती. बादशहा स्वैरतेचा मूर्तिमंत पुतळाच बनला होता. जर कधी त्याने राज्यकारभारतात लक्ष्य घातलेच तर ते खुस्रोखानच्या माध्यमानेच घालीत असे. कैकुबादच्या रंगविलासांच्या महफिली बघितलेले लोक अजूनही हयात होते. परंतु मुबारकशाहने त्याच्याही पुढे मजल मारली होती. शेवटी अंतिम घाव बसला आणि चार वर्षे राज्यपद उपभोगल्यानंतर मुबारकशाहदेखील आपल्या आवडत्या खुस्रोखानच्या हातून मारला गेला. अशा रीतीने खिलजी वंशाची राजवट समाप्त झाली.

दिल्लीचे तख्त हडप करावे हाच या दगलबाजीमागे खुस्रोखानचा उद्देश होता व त्यात त्याला सफलताही मिळाली. बादशहाला जेव्हा खुस्रोखानच्या बंडखोरीची कल्पना आली तेव्हा धोका ओळखून बादशहा जनानखान्याकडे पळाला परंतु खुस्रोखान व त्याच्या साथीदारांनी त्याला हतबल करून त्याचा शिरच्छेद केला. तख्त काबीज केल्यानंतर खुस्रोखानने निरपराध्यांना मारून टाकण्याचे घृणास्पद कृत्य सुरू केले. दरबारी अमिरांना अवमानित करण्यात आले. कुराणचा अधिक्षेप करण्यात आला आणि मशिदींतून मूर्ती ठेवण्यात्त आल्या. परिस्थिती इतकी बिघडली, की मंगोलांचे हल्ले रोकण्याचे श्रेय पदरी असलेला मलिक तुगलक, खुस्रोखानच्या दगलबाजीचा सूड उगविण्यासाठी त्याच्यावर आपल्या सैन्यानिशी चालून आला. शेवटी खुस्रोखानच्या फौजांचा पराभव झाला आणि खुस्रोखान मारला गेला.

अलाउद्दीनच्या मृत्यूनंतर लवकरच नैतिक अधःपात आणि राजकीय हीनतेचा काळ सुरू झाला. विशेषतः मलिक काफूरने त्याला अधिकच वेग दिला. या अवनतीच्या अपवित्र काळात एक अल्प कालावधी सोडल्यास, अमीर खुस्रो प्रत्यक्ष राजकीय घडामोडींपासून दूर राहून आपल्या कलेच्या निर्मितीत मग्न झाले. भोवतालच्या परिस्थितीची त्यांना कल्पना नव्हती, असा मात्र याचा अर्थ नव्हे! दरबारातील कटकारस्थाने, निर्दयपणे केले जाणारे खून आणि अनेक प्रकारच्या गर्हणीय व निर्लज्ज कृतींचे ते मूक परंतु प्रत्यक्ष साक्षीदार होते. कुतुबुद्दीन मुबारकशाह खिलजी चुकीच्या वाटेने चालला होता आणि हजरत निजामुद्दीन अवलियाशी त्याचे संबंध चांगले नव्हते पण तरीही खुस्रोने बादशहाबरोबरचे आपले संबंध टिकवून ठेवले होते आणि बादशहादेखील त्यांचा खूप आदर करीत होता. आपल्या राजवटीचा इतिहास लिहिण्यास जेव्हा बादशहाने सांगितले तेव्हा खुस्रोने आपली *नहसिपहिर* ही मसनवी रचली. बादशहानेदेखील खुस्रोला हत्तीच्या भारंभार सोने देण्याचे वचन दिले होते आणि त्याने बहुधा ते पाठवले असावे कारण स्वतः खुस्रोंनीच म्हटले आहे, की 'बादशहाने मला असे

पारितोषिक दिले जे यापूर्वी कोणत्याही बादशहाने दिले नव्हते.' बादशहाची स्तुती करताना त्याला उद्देशून आपल्या या मसनवीत खुस्रो म्हणतात :

"हे बादशहा, हे द्रव्यदान करणाऱ्या आणि कृपा करणाऱ्या, विद्या आणि कलांचे महत्व ओळखणाऱ्या आणि काव्य व साहित्याला आश्रय देणाऱ्या! तुझ्यासारख्या जमशीद (इराणचा प्रसिद्ध बादशहा) कडून मला जे पारितोषिक मिळाले आहे ते यापूर्वीच्या काळात मला क्वचितच मिळाले असेल :

आता माझ्यासारख्या कवितेच्या जादूगाराकडून तुझ्या उदारतेला शोभेल अशी प्रशंसा अवश्यमेव केली जाईल.

# तीन

राज्यात प्रथम शांतता व सुव्यवस्था निर्माण केल्यानंतर गियासुद्दीन तुगलकने जेव्हा बघितले, की त्याच्या धन्याच्या वंशातील कोणीही व्यक्ती जिवंत नाही, तेव्हा तो स्वतःच, कसलीही आडकाठी किंवा कसलाही विरोध न होता दिल्लीच्या तख्तावर आरूढ झाला. खुस्रो यावेळी सत्तर वर्षे वयाच्या परिपक्व अवस्थेत होते. नव्या बादशहाचे त्यांनी या शब्दांत स्वागत केले आहे :

''वर्षानुवर्षे आकाशस्थ ताऱ्यांनी केलेल्या परिभ्रमणानंतरच तुगलकशाहसारखा इस्लामचा सहाय्यक आणि धर्माचा रक्षणकर्ता निर्माण झाला.'' अमीर खुस्रोने *तुगलकनामा* या आपल्या काव्यात उल्लेख केल्याप्रमाणे गियासुद्दीन तुगलक 720 हिजरीमध्ये शाबान महिन्याच्या पहिल्या तारखेस सिंहासनारूढ झाला. तो अत्यंत सात्विक आणि मृदु अंतःकरणाचा होता आणि अमीर खुस्रोचा फार आदर करीत होता. गियासुद्दीन तुगलक राज्यारूढ झाल्यावर लागलीच देवगिरी येथे बंडाळी माजली. तेथील राजा लद्दरदेव याने दिल्लीच्या तख्तविरुद्ध बंडाचा झेंडा उभारला. हे बंड मोडून काढण्यासाठी बादशहाने आपला मुलगा जुनाखान ऊर्फ उलगखान यास विनाविलंब 725 हिजरीमध्ये सैन्यासह पाठविले. अमीर खुस्रो बहुधा उलगखानबरोबर गेले असावेत. *सफियत-उल्-अवसाफ* हा आपला कसीदा त्यांनी उलगखानच्या विजयी मोहिमांवर आधारून लिहिला!

या कसीद्यात देवगिरी (कुतुबुद्दीन मुबारकशाह खिलजी याच्या नावावरून यावेळी जे 'कुतुब-आबाद' म्हणून ओळखले जात असे.) येथील इमारतींचे वर्णन आले आहे. असे वाटते की देवगिरीच्या सौंदर्याने ते फारच प्रभावित झाले असावेत. उलगखानच्या प्रशंसापर रचलेल्या आपल्या एका कसीद्यात या नगरीविषयीच्या आपल्या भावनांचा आविष्कार त्यांनी असा केला आहे :

''ही नगरी आश्चर्यकारक आणि मंगल आहे. समृद्ध राज्याची ही जणू वधूच! कुतुबुद्दीनच्या दरबारातून *कुतुब-आजाद* हे नाव या नगरीस लाभले. जेव्हा येथे पाखंड वाढले तेव्हा दैत्यांनी येथील लोकांना त्रास देण्यास प्रारंभ केला. याच कारणामुळे कोणा प्राचीन देवाने (उर्दू-फारसीमध्ये देव या शब्दाचा अर्थ दैत्य-राक्षस असा आहे.) देवगिरी हे नाव ठेवले. आता ही नगरी म्हणजे इस्लामचे 'बीज'च झाल्यामुळे मांगल्य, भाग्य आणि प्रसादाच्या समुद्रावाचून येथे अन्य काही उत्पन्नच

होऊ शकणार नाही. या नगरीला स्वर्ग म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही परंतु शद्दाद (आपण परमेश्वर आहोत असा दावा करणारा एक प्राचीन बादशहा) च्या स्वर्गाशी घोटाळा होईल म्हणून मी तसे म्हणत नाही. इस्लामच्या अधिपत्याखाली स्वर्गरूपत्व प्राप्त व्हावे हे या नगरीच्या दैवातच होते हे निश्चित! म्हणून तर इतक्या काळजीपूर्वक तिला सजविण्यात आले आहे."

मात्र उलगखानला या मोहिमेत यश मिळाले नाही. सुलतान गियासुद्दीन तुगलक मरण पावल्याची अफवा सैन्यात पसरल्यामुळे त्याला परत फिरावे लागले. शक्य तेवढ्या घाईने तो दिल्लीला परत आला. काही महिने दिल्लीत विश्रांती घेतल्यानंतर तो पुन्हा या मोहिमेवर निघाला व यावेळी मात्र यशस्वी झाला.

लखनौतीला जाण्यापूर्वी गियासुद्दीन तुगलकने तुगलकाबादचा किल्ला बांधवून घेतला होता. इब्न बतूताने देखील आपल्या प्रवासवर्णनात या किल्याची स्तुती केली आहे. खुस्रोच्या *निहायत-उल्-कमाल* या संग्रहातदेखील *दरतारीफ-इ-तुगलकाबाद* या नावाची एक मसनवी समाविष्ट असून, तिच्यातील या किल्ल्याच्या वर्णनावरून इब्न बतूताने वर्णिलेल्या गोष्टींची साक्ष पटते. उपरिनिर्दिष्ट *मसनवीमध्ये* या किल्यातील एका हौदाचे वर्णन पुढील शब्दांत करतात :

"किल्ल्यामध्ये एक असे सुंदर स्थळ आहे, की ज्याला जीवनाचा झराच म्हटले पाहिजे! त्यातील पाण्याचा रंग आणि नितळपणा अत्यंत शुद्ध स्वरुपाचा आहे. येथील दगडांनी माधुर्य चाखलेले आहे. त्याचा किनारा नवजीवन देतो आणि आयुष्य वर्धन करतो. येथील पाणी म्हणजे आनंदवर्धक कालवाच होय."

लोकांच्या सोयीसाठी, बादशहाने किल्ल्याच्या बाहेरही एक हौद बांधविला होता; त्याच्यासंबंधी खुस्रो म्हणतात :

"किल्ल्याच्या बाहेर समुद्राप्रमाणे विस्तीर्ण असा एक हौद असून, त्याच्या प्रत्येक कोनात जणू एक एक नदीच वाहत असते. येथील पाणी जीवनाला इतके सुखदायी आहे, की त्यामुळेच 'कौसरची बहीण'* म्हणून त्यास ओळखले जाते.

विस्तीर्ण अशा या हौदाच्या सुंदर शोभेमुळे आकाशातील मेघ याच्यावर दुधाचा वर्षाव करतात.

याच्या मधोमध गगनचुंबी असा एक महाल असून, त्याचे तेज चतुर्दशीच्या चंद्रालाही फिके पाडते. या महालाच्या भिंती आणि छत निखळ सोन्याचे असून, जगाला प्रकाशित करणाऱ्या मोत्यांनी त्याची सजावट करण्यात आली आहे."

अमीर खुस्रोशी सुलतान गियासुद्दीन तुगलकचे संबंध चांगले असले तरी *महबूबे इलाही* (परमेश्वराचे आवडते) निजामुद्दीन अवलिया (सत्पुरुष) यांच्या हालचालींविषयी

---

* *कौसर*—स्वर्गातील पुष्करिणी

मात्र तो समाधानी नव्हता : त्यांच्याविषयी त्याचे मन साशंक होते. इतिहासात याची अनेक कारणे सांगितली जातात. एक कारण हे, की खुस्रोखानने जेव्हा सिंहासन बळकावले तेव्हा साधू, विद्वान अमीर आणि सामान्यजनांना संतुष्ट करण्याच्या हेतूने दानाच्या रुपाने वारेमाप पैसा उधळला, राज्याचा खजिना रिकामा केला. फेरिश्ता या इतिहासकाराच्या म्हणण्यानुसार या वाटलेल्या द्रव्यापैकी पाच लाख तंक्यांची रक्कम *हजरत सुलतानुत्माशायख* (श्रेष्ठ धर्मगुरू) निजामुद्दीन अवलिया यांच्या वाट्यालाही आली. त्यांनी ती सर्व रक्कम मुक्तहस्ताने फकिरांना व गोरगरिबांना वाटून टाकली. आता जेव्हा गियासुद्दीन तुगलक अधिपती बनला तेव्हा त्याला खजिना पूर्णतः रिकामा असल्याचे आढळून आले. त्याला फार चिंता वाटू लागली. त्याने ही वाटण्यात आलेली सर्व रक्कम परत मिळविण्याचा निर्णय केला. हजरत निजामुद्दीन यांच्याकडेही तशी मागणी करण्यात आली. 'ही रक्कम खजिन्यातील होती तेव्हा फकीर व गोरगरिबांचा तिच्यावर हक्क होता; त्यांनाच ती वाटण्यात आली,'' असे उत्तर त्यांनी बादशहाला कळविले. बादशहा निराश झाला पण निजामुद्दीन अवलियांविषयी त्याच्या मनात तणाव निर्माण झाला. हजरत निजामुद्दीन अवलियांविषयी बादशहाच्या मनात अढी निर्माण होण्याचे दुसरे कारण कव्वालीच्या मेळाव्यांच्या मान्यतेसंबंधीचे होते. आधी सांगितल्याप्रमाणे स्वतः बादशहा *शरीयतच्या* आदेशांचे काटेकोर पालन करणारा होता. *शरीयत* (इस्लामी कायदा)ची अंमलबजावणी करण्यात तो सतत प्रयत्नशील असे. बादशहाच्या नित्याच्या परिवारात असे लोकही होते ज्यांनी हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्या निवासस्थानी होणाऱ्या कव्वालींच्या महफिलीसंबंधी या लोकांनी बादशहाचे कान फुंकण्यास सुरवात केली आणि त्यांना या *समाअ* (कव्वालीची महफिल) संबंधी आपली भूमिका स्पष्ट करण्यासाठी दरबारात हजर होण्यास सांगण्यात आले. असं म्हणतात, की याप्रसंगी बादशहाच्या सूचनेवरून काजी जलालुद्दीन यांनी हजरत निजामुद्दीन अवलिया यांचा अधिक्षेप करणारी भाषा वापरली.*

दिल्लीचे प्रमुख काजी, कमालुद्दीन बिन बुऱ्हानुद्दीन याचा हवाला देऊन इब्न बतूताने यासंबंधीचे आणखी एक कारण सांगितले आहे. शाहजादा जुनाखान ऊर्फ उलगखान हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्यावर निष्ठा बाळगणाऱ्यांपैकी होता. तो अनेकदा त्यांच्या सेवेला हजर राहत असे. धर्मशाळेतील उपस्थितांना व सेवकांना त्याने एकदा अशी इच्छा व्यक्त केली, की हजरत जेव्हा देहभान हरपलेल्या तंद्रीच्या अवस्थेत असतील तेव्हा त्याला तात्काळ कळविण्यात यावे. त्याप्रमाणे तशी वेळ येताच शाहजाद्याला कळविण्यात आले. तो लागलीच तेथे आला. हजरत निजामुद्दीन अवलिया त्याला बघताच उद्‌गारले, ''आम्ही तुला राज्य दान केले आहे.'' ही घटना घडली तेव्हा उलगखान नायब मलिकचे पद

---

* झियर-उल-अवलिया : *अमीर खुस्रो.*

सांभाळीत होता व बादशहा लखनौतीला गेलेला होता. तो अजून दिल्लीला परतला नव्हता. याच कालावधीत हजरत निजामुद्दीन यांना मृत्यू आला व त्यांच्या प्रेतयात्रेत शाहजाद्याने स्वतः खांदा दिला. ही वार्ता बादशहाला कळाली तेव्हा तो फारच नाराज झाला."* या सर्व कारणांमुळेच परंपरेने चालत आलेल्या पुढील कथेला बळकटी येते :

लखनौतीहून दिल्लीला येण्यासाठी बादशहा निघाला तेव्हा त्याने हजरत निजामुद्दीन अवलिया यांना निरोप पाठविला, की तो दिल्लीला पोहोचण्यापूर्वीच त्यांनी दिल्ली सोडून निघून जावे. एक तर दिल्लीत हजरत निजामुद्दीन राहतील किंवा मी राहीन. हा आदेश मिळाल्यावर हजरत निजामुद्दीन अवलिया यांनी जे ऐतिहासिक उद्गार काढले ते अजूनही एखाद्या म्हणीप्रमाणे सर्वत्र वापरले जातात. ते म्हणाले, *'हनूज दिल्ली दूर अस्त.'* दिल्ली तर अजून दूर आहे.† आणि झालेही तसेच. बादशहा दिल्लीत प्रवेश करण्यापूर्वीच त्याच्या स्वागतार्थ बांधण्यात आलेला भव्य दरवाजा अंगावर कोसळून मरण पावला. ही घटना इ. स. 1325 मधील होय.

याच वर्षी हजरत निजामुद्दीन अवलिया यांनाही मृत्यू आला. खुस्रो यावेळी दिल्लीत नव्हते. सुलतान गियासुद्दीन तुगलकबरोबर तेही लखनौतीहून परतत होते. त्यांना बहुधा वाटेतच ही वार्ता कळाली असावी. दिल्लीला आल्यावर ते हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्या कबरीजवळ गेले. असेही सांगितले जाते की कबरीकडे जाण्यापूर्वी त्यांनी आपल्या मस्तकावरील केस कापून टाकले आणि तोंडाला काळे फासून घेतले. कबरीजवळ जाताच उद्गारले 'सुब्हान अल्ला! काय आश्चर्य आहे! सूर्य धरणीच्या पोटात दडावा आणि खुस्रोने जिवंत राहावे!" आणि मग पुढील हिंदी दोहा उत्स्फूर्तपणे त्यांच्या मुखातून बाहेर पडला.

*"गोरी सोवे सेज पर और मुखपर डारे केस*
*चल खुस्रो घर अपने रैन भई चौदेस"*

(गोरी शेजेवर झोपली आहे. तिचे केस मुखावर आलेले आहेत. खुस्रो, आता आपल्या घरी चल. रात्र चारी दिशांना पसरली आहे.)

हा दोहा म्हणताच ते बेशुद्ध झाले. शुद्धीवर येताच म्हणाले, "यानंतर जगण्याचा व जीवनाचा उपभोग घेण्याचा मला अधिकार नाही." त्यानंतर त्यांनी आपले सर्व सामान, सर्व चीजवस्तू आपले गुरू निजामुद्दीन अवलियाच्या नावाने दान करून टाकले. यानंतर केवळ सहा महिन्यांतच बुधवार, दि. 18 शवाल 725 हिजरी, (इ. स. 1327) रोजी ते परमात्म्यास जाऊन मिळाले. त्यांच्या इच्छेनुसार आपल्या गुरूच्या चरणांशीच त्यांना दफन करण्यात आले.††

---

*मुमताज हुसेन : *अमीर खुस्रो देहलवी* या ग्रंथात इब्न बतूतांच्या प्रवासवर्णनातून घेतलेला उतारा.
† अब्दुल कादर बहायूजी : *मुन्तकब-उल्-तवारीख*
†† डॉ. वहीद मिर्जा : *अमीर खुस्रो—चरित्र आणि कर्तृत्व*

अशा रीतीने अनेक घडामोडींनी भरलेले एक जीवन आपल्या शेवटच्या मुक्कामाला पोहोचले. खुस्रोने अनेक स्थित्यंतरे बघितली, अनेक चढ-उतार अनुभवले. गुलाम वंशाच्या राजवटीपासून ते खिलजी वंशापर्यंत अनेक राजवंशाचे उत्कर्ष आणि अपकर्ष त्यांनी प्रत्यक्ष पाहिले. मंगोलियाच्या जुलमी हाताच्या तावडीत ते सापडले. अनेक बादशहा आणि शाहाजाद्यांची स्तुतिस्त्रोत्रे त्यांनी गायली. आपल्या काव्यगुणांचे व कलात्मकतेचे उच्चतम शिखर त्यांनी गाठले आणि शेवटी आपले आध्यात्मिक गुरू, स्वामी हजरत सुलतान कल्-मशायखाँ महबूबे इलाही निजामुद्दीन अवलिया यांचे ते निष्ठावान व आज्ञाधारक सेवक बनले. सारांश अमीर खुस्रोसारखी माणसे क्वचित जन्माला येतात आणि जेव्हा तेव्हा चिरंजीवित्व घेऊन येतात व भविष्यावर आपल्या श्रेष्ठ कर्तृत्वाचे न मिटणारे ठसे उमटवून जातात. अमीर खुस्रो सर्व कालांचे आहेत आणि जवळच्या वा दूरच्या सर्व लोकांकडून आपल्या मृत्यूनंतरही कृतज्ञतेची खंडणी वसूल करीत आहेत. इक्बालने म्हटले आहे :

''ऐबक आणि घोरी यांनी केलेली युद्धे नामशेष झाली. परंतु खुस्रोचे गीत मात्र अजूनही ताजे आणि मधुर आहे.''* डॉ. वहीद मिर्जा यांनी आपल्या 'अमीर खुस्रो—चरित्र आणि कर्तृत्व' या इंग्रजी ग्रंथांत म्हटल्याप्रमाणे बाबरच्या काळापासून खुस्रोच्या कबरीवर कसलीही पक्की इमारत बांधण्यात आलेली नाही. भोवतालच्या चार भिंती आणि कबरीवरील नामशिला, बाबरच्याच काळातील एक अमीर मेहदी ख्वाजा यांच्या निगराणीत तयार झाल्या आहेत. नामशिलेवर त्याच काळातील एक कवी शहाब मुअम्माई याचे एक पद्य लेखांकित केलेले असून, त्यात खुस्रोच्या मृत्यूचा दिनांक नोंदलेला आहे.

---

* डॉ. वहीद मिर्जा : *अमीर खुस्रो—चरित्र आणि कर्तृत्व*

# चार

अमीर खुस्रोसंबंधी त्यांचे आध्यात्मिक मार्गदर्शक व गुरू हजरत निजामुद्दीन अवलिया यांना वगळून आम्ही विचारच करू शकत नाही. खुस्रोवर त्यांची जी कृपादृष्टी होती तिचे सविस्तर वर्णन करण्यास येथे अवसर नाही. वस्तुतः, स्वतः खुस्रो हेच हजरत निजामुद्दीन यांचे एक श्रेष्ठतम कर्तृत्व होय. स्वतः खुस्रोदेखील तशी कबुली देतात. हजरत निजामुद्दीन यांच्याशिवाय अमीर खुस्रो जवळजवळ नसल्यासारखेच होत. खुस्रोवर त्यांचा जो प्रभाव पडला तसा इतर कोणावर पडलेला आढळत नाही. पावित्र्य आणि संतत्वाचा जो ठसा त्यांनी खुस्रोच्या मनावर, किंबहुना त्यांच्या संपूर्ण अस्तित्वावर उमटविला त्याच्या गडद खुणा कायम स्वरुपात खुस्रोच्या चारित्र्यात स्पष्टपणे जाणवतात. खुस्रोच्या अंगभूत गुणांच्या अंतर्बाह्य विकासास कारण त्यांचे जीवनचरित्र अव्यक्त राहण्याचीच शक्यता अधिक आहे.

*सुलतान-उल्-अवलिया महबूबे इलाही सुलतान-उल्-मशायरव* आणि *सुलतानजी* या प्रेमळ व पवित्र नावांनी ओळखले जाणारे, महम्मद निजामुद्दीन यांचा जन्म इ. स. 1236 मध्ये बुधवारी (दि. 27 सफर 634 हिजरी) सूर्योदयानंतर झाला. त्यांच्या मातोश्रींचे नाव हजरत बीबी जुलेखा आणि पित्याचे नाव सय्यद अहमद महम्मद. निजामुद्दीन पाच वर्षांचे झाले आणि त्यांच्या पित्याचा मृत्यू झाला. त्यांच्या संगोपनाची व शिक्षणाची सारी जबाबदारी त्यांच्या मातोश्रींवर पडली. अनेक अडचणींना तोंड देत त्यांनी आपल्या मुलाच्या प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था केली. अलाउद्दीन उसूली हे महम्मद निजामुद्दीन यांचे पहिले शिक्षक. त्यांनी आपल्या या शिष्याची मोठ्या काळजीपूर्वक व कष्ट सोसून देखभाल केली.

हजरत सुल्तान-उल्-मशायरव यांचे प्रारंभीचे जीवन म्हणजे संयम आणि संतुष्ट वृत्तीचे दुर्मीळ उदाहरणच होते. या काळात कधी कधी घरात खाण्यासाठी काहीच नसायचे. अशावेळी त्यांच्या मातोश्री सांगत, की 'आज आपण परमेश्वराचे पाहुणे आहोत.' हे उद्‌गार ऐकले, की आपल्याला एक विलक्षण आनंद आणि अवर्णनीय प्रसन्नता यांची धुंदी जाणवत असे, असे स्वतः हजरत निजामुद्दीन यांनीच म्हटले आहे. बदायूनमधील त्यांचे दिवस असेच व्यतीत झाले. वयाच्या सोळाव्या वर्षी आपल्या आईबरोबर ते दिल्लीला आले. सुलतान नासिरूद्दीन महमूद यावेळी दिल्लीच्या तख्तावर विराजमान होता व राज्याच्या कारभाराची सर्व सूत्रे गियासुद्दीन बल्बनच्या हाती होती. या

काळात दिल्लीमध्ये मौलाना शम्शुद्दीन खुराज्मी यांच्या ज्ञान आणि विद्वत्तेची कीर्ती सर्वत्र पसरलेली होती. हजरत निजामुद्दीन त्यांच्या शिष्यवर्गात प्रविष्ट झाले आणि या ज्ञानाच्या व विद्वत्तेच्या स्त्रोतांतून त्यांनी असे आकंठ पान केले, की लवकरच ते 'मौलाना निजामुद्दीन' म्हणून ओळखले जाऊ लागले. ज्ञान आणि विद्वत्तेचा जमा अपार साठा प्राप्त करूनही त्यांना तृप्ती मात्र लाभली नव्हती. आपल्यात अजून काही तरी उणाव आहे, असे त्यांना सतत वाटत होते. आपल्या हृदयावर एखादे ओझे असल्याचे त्यांना जाणवत होते. आपल्या मित्रांना ते सांगत, की तुमच्याबरोबर मी फार दिवस राहू शकणार नाही.

बाबा फरीदुद्दीन गंजशकर यांच्या प्रत्यक्ष भेटीचा योग येण्यापूर्वीच त्यांच्याविषयी हजरत निजामुद्दीन यांना एक प्रकारचे गूढ आकर्षण वाटू लागले होते. जेव्हा केव्हा, आनंदित होत असत आणि बहुधा नमाजनंतर ते त्यांचे नामस्मरण करीत असत. हजरत बाबासाहेबांचे धाकटे बंधू हजरत शेख नजीबुद्दीन मुतर्वाक्कल हेदेखील दिल्लीतच राहत होते. त्यांच्या घराजवळ असलेल्या मशिदीच्या एका खोलीतच हजरत निजामुद्दीन यांचे वास्तव्य होते. हजरत नजीबुद्दीन मुतर्वाक्कल यांच्याकडे वारंवार जात येत असत व त्यामुळे हजरत बाबा फरीदुद्दीन यांच्याविषयीची त्यांची ओढ अधिकच तीव्र झाली. शेवटी अजोधन येथे असणाऱ्या हजरत बाबासाहेबांच्या समक्ष भेटीस जाण्याचा त्यांनी निश्चय केला. त्याप्रमाणे बुधवार, दि. 10 रजब 655 हिजरीला त्यांनी हजरत बाबा फरीदुद्दीन यांच्या चरणी मस्तक ठेवले. याप्रसंगी हजरत बाबासाहेबांनी पुढील शेर म्हटला :

*''ऐ आतिशे फिराकत दिलहा कबाब करदा*
*सैलाबे इश्तियाताक जानहा खराब करदा''*

(अरे, तुझ्या वियोगाच्या अग्नीने हृदयांचे कबाब करून टाकले आणि तुझ्या प्रेमाच्या पुरात अनेक जीव उद्ध्वस्त करून टाकले.)

याचवेळी आपल्या वयाच्या विसाव्या वर्षी हजरत निजामुद्दीन यांनी हजरत बाबांचे शिष्यत्व पत्करले आणि अशा रितीने त्यांच्या जीवनेतिहासाचे नवे पर्व सुरू झाले. शिष्यत्व स्वीकारल्यानंतर हजरत बाबासाहेबांनी हजरत निजामुद्दीन यांच्या शिक्षणाकडे व नैतिक विकासाकडे विशेष लक्ष पुरविले. *अवारिक-उल्-मआरिक* या शहाबुद्दीन सुऱ्हावर्दी यांच्या ग्रंथाची पहिली सहा प्रकरणे सविस्तर शिकविली. त्याशिवाय आवश्यक वाटणाऱ्या अन्य ग्रंथांचेही ज्ञान करून दिले. आठ महिन्यांच्या या अभ्यासानंतर 2 *रबिउल् अव्वल* 656 हिजरीला हरजत बाबासाहेबांनी हजरत निजामुद्दीन यांच्या मस्तकी पवित्र *दस्तार* चढविली, हाती दंड दिला, चिश्ती कुलाचा पारंपरिक वेष परिधान करविला, कृतज्ञताद्योतक अशी नमाज पढावयास लावली आणि हजरत शेख बद्रुद्दीन इस्हाक यांच्याकडून खिलाफतची सनद लिहून घेऊन त्यांना प्रदान केली आणि मिठी मारून ते त्यांना म्हणाले, ''जा, तुला परमेश्वराच्या स्वाधीन केले आहे.'' हजरत बाबांचा आदेश

मिळताच हजरत निजामुद्दीन दिल्लीला आले आणि सर्व लोकांना मार्गदर्शन करून मनःशांती प्रदान करण्याच्या आपल्या महत्वाच्या कार्यात गढून गेले.

हजरत सुलतान-उल्-मशायरव यांनी सांगितले आहे, की एकदा आपल्या एका विद्वान वर्गमित्राबरोबर ते अजोधनला गेले होते. हजरत सुलतान-उल्-मशायरव यांच्या अंगावरील जुने झालेले फाटकेतुटके कपडे बघून त्या विद्वानांनी अत्यंत खेद प्रगट केला व चांगले उत्पन्न देणारा शिक्षकाचा पेशा पत्करण्याचा त्यांना सल्ला दिला. हजरत निजामुद्दीन यांनी सद्भावनेने प्रेरित झालेले आपल्या मित्राचे म्हणणे ऐकून घेतले आणि आपली असमर्थता व्यक्त केली. जेव्हा हजरत निजामुद्दीन हजरत बाबासाहेबांना भेटले तेव्हा अन्य काही विचारपूस न करता म्हणाले :

"निजाम! जर तुमचा एखादा मित्र तुम्हाला भेटला आणि म्हणाला, की तुम्ही स्वतःला या कनिष्ठ पातळीवर का आणून सोडले आहे? चांगले पैसे मिळवून देणारा व सुखाचे जीवन प्राप्त करून देणारा शिक्षकी पेशा का नाकारीत आहात? तुम्ही या स्थितीत येथे का राहिला आहात? तर तुम्ही त्याला काय उत्तर द्याल?" हजरत सुलतान-उल्-मशायरव यांनी अत्यंत विनयाने उत्तर दिले, "जी आपली आज्ञा." हजरत बाबासाहेब म्हणाले, "कोणी जर तुला असा प्रश्न केला, तर तुझे उत्तर असे असले पाहिजे :

*"न हमराही तू मेरा, राहे खीश गीर-ओ-बेरो*
*तोरा सलामती बादा, मेरा निगूं सारी।"*

(तू माझा साथी नाहीस. आपला रस्ता धर आणि जा. परमेश्वर करो, तुला सुखसमाधान लाभो व मला माझे दारिद्य!)

दुसऱ्या एका प्रसंगी, हजरत बाबासाहेबांनी आपला मुखरस सुल्तान निजामुद्दीन यांच्या तोंडात टाकला आणि कुरानेशरीफ (कुराण) मुखोद्गत करण्यास सांगितले. ते म्हणाले, "परमेश्वराने तुझ्या नशिबात, भौतिक आणि आध्यात्मिक सुखे ठेवली आहेत. तुझे जीवन संयमी व त्यागपूर्ण असावे."

जेव्हा हजरत निजामुद्दीन यांनी आपला खिलाफतनामा, हजरत मौलाना जयालुद्दीन हांसवी यांना दाखविला तेव्हा मौलाना अत्यंत आनंदाने उद्गारले,

*"खुदा-ए-जहांरा हजारां सिपारा*
*के गौहर सिपुर्दा ब गौहर-शिनास"*

(परमेश्वराचे लक्षावधी आभार मानले पाहिजेत, की त्याने पारख असणारालाच मोती प्रदान केले आहेत.)

हजरत निजामुद्दीन यांना हजरत बाबासाहेब एकदा म्हणाले, की 'तू एक घनदाट सावली असलेला वृक्ष होशील व तुझ्या सावलीत सारे जीव विसावतील.'

आपल्या गुरुंच्या आदेशानुसार हजरत निजामुद्दीन दिल्लीचे निवासी बनले. येथेच त्यांना आध्यात्मिक क्षेत्रातील विजय मिळवावयाचे होते व सर्व मानवांना आत्मिक

वैभवाचा मार्ग दाखवायचा होता. दिल्लीत आल्यावर हजरत निजामुद्दीन तसे अनेक ठिकाणी वास्तव्य करून राहिले पण शेवटी गियासपुऱ्यात त्यांनी कायम वास्तव्य स्वीकारले. हा निर्णय घेण्यापूर्वी दैनंदिन जीवनाच्या धावपळीपासून दूर कोठे तरी एकांतात रहावे, असे त्यांना वाटत होते परंतु एक दिवस एक अपरिचित तरुण त्यांच्याकडे आला व म्हणाला :

*आं रोज कि मेहशुदीनमी दानस्ती?*
*कंगुश्त-नुमा-ए जहाँ खही शुद*
*इमरोज के जुल्फते दिल रवल्के बरबूद*
*दरगोशा नस्तनस्त नमी दारद सूद।*

(ज्या दिवशी तू चंद्र झालास तेव्हा माहीत नव्हते काय, की जग तुझ्याकडे अंगुली निर्देश करील? आज जेव्हा तुझ्या केसांची बट जगाचे हृदय वेधून टाकीत आहे; तू दूर एकांतात जाऊन बसल्याने काय फायदा होणार?)

मग त्या तरुणानेच त्यांना धीर दिला आणि जगापासून दूर पलायन करून एकांतात राहण्यापासून परावृत्त केले. दिल्लीमध्ये गियासपुरा (सध्या हजरत निजामुद्दीनची बस्ती म्हणून ओळखला जाणारा भाग) येथे राहू लागल्यापासून श्रेष्ठ कनिष्ठ, सर्वांच्या निष्ठेचे ते केंद्र बनले. शाहजादे आणि अमीर, विद्वान व ज्ञानी आणि प्रतिष्ठित व सामान्य जण सारेच त्यांच्याकडे येत व त्यांचे आशीर्वाद मिळवीत व आपले कल्याण साधीत.

गियासपुऱ्यात रहावयास आल्यानंतरदेखील हजरत निजामुद्दीन यांची अशी स्थिती होती, की वर्षानुवर्ष त्यांना आपल्या दैनंदिन गरजादेखील पूर्ण करता येत नसत. पण एक वेळ अशी आली, की गरिबी आणि हलाखीचे हे दिवस संपून गेले आणि अन्नखर्च व फकीर, कंगालांना केला जाणारा दानधर्म दिवसाला हजार तंक्यांपर्यंत होऊ लागला. त्यांच्याकडे येणारा कोणीही रिकाम्या हाताने परतत नसे. त्यानंतर जे काही अर्पण केले जात असे ते सर्व तात्काळ फकिरांना व गरजवंतांना वाटले जात असे आणि जेव्हा जवळ काही उरले नसे तेव्हा एक आध्यात्मिक शांती व समाधान जाणवत असे. स्वतः हजरत निजामुद्दीन नेहमी रोजे (दिवसभराचा उपवास) पाळीत असत. सूर्योदयाला रोजा प्रारंभ करण्यापूर्वी (सहर) व सूर्यास्ताला रोजा सोडताना देखील (इफ्तार) ते नाममात्रच काही तरी खात असत. आपले जेवण ते नेहमीच परत पाठवीत. फारच आग्रह झाला तर म्हणत, "परमेश्वराचे हजारो दरिद्री सेवक सडकांवर, दुकानांच्या फळ्यांवर व मशीदींच्या कानाकोपऱ्यांत उपाशीपोटी रात्र घालवितात. मग हे अन्न निजामुद्दीनच्या घशाखाली कसे बरे उतरणार?" एकदा ते म्हणाले, "मला जे दुःख आणि व्यथा जाणवते, ती या जगात अन्य कोणालाच जाणवत नाही. कारण अनेक लोक माझ्याकडे येतात व आपली दुःखे, आपल्या व्यथा मला सांगतात आणि त्यांनी माझे अंतःकरण व्यापून टाकतात." सारांश, हजरत निजामुद्दीन यांची धर्मशाळा म्हणजे, परिस्थितीने गंजलेल्यांचे, निराश झालेल्यांचे,

पीडितांचे, व्यथितांचे, दुःखितांचे, गरजवंतांचे व दुर्दैवी जनांचे आश्रयस्थानच होते. ते प्रत्येकाला आधार देत, धीर देत आणि सारे जण संतुष्ट व आनंदित होऊन परत जात.

दिल्लीला आल्यापासून मृत्यूपर्यंत हजरत निजामुद्दीन यांनी पाच बादशहांच्या राजवटी बघितल्या पण कधीही कोणा बादशहाशी संबंध ठेवला नाही. एक अपवाद वगळता ते कधीही शाही दरबारात गेले नाहीत. तसेच कोणाही बादशहाला त्यांनी आपल्या भेटीची परवानगी दिली नाही. सुलतान जलालुद्दीन खिलजी व सुलतान अलाउद्दीन खिलजी यांनी त्यांची भेट घेण्याचा फार प्रयत्न केला पण तशी अनुमती मिळू शकली नाही. एकदा हजरत निजामुद्दीन म्हणाले, की ''माझ्या निवासाला दोन दरवाजे आहेत; बादशहा जर एकातून आत आला तर मी दुसऱ्या दरवाजाने बाहेर पडेन. एकदा बादशहा जलालुद्दीनने अमीर खुस्रोला आपल्या विश्वासात घेऊन हजरत निजामुद्दीन यांची भेट घेण्याचे ठरविले. अमीर खुस्रोने बादशहाच्या योजनेची त्यांना पूर्वकल्पना दिली आणि बादशहाची ही योजना प्रत्यक्षात उतरण्यापूर्वीच ते अजोधनला निघून गेले. बादशहाला जेव्हा हे कळाले तेव्हा त्याने अमीर खुस्रोला वस्तुस्थिती विचारली. अमीर खुस्रोंनी उत्तर दिले, 'बादशहाला नाराज करून मी फार तर इहलोकाला मुकेन. परंतु हजरत सुलतान-उल्-मशायरवना नाराज केले तर परलोकीच्या कृपेलाही पारखा होईन.'' या प्रसंगांवरून हे कळून येते, की लौकिक व्यवहारापासून हजरत निजामुद्दीन किती अलिप्त होते. इक्बालच्या शब्दांत सांगावयाचे तर या जगात मग्न होणाऱ्यांपैकी ते नव्हते. तर ज्यांच्यात हे जगच मग्न होऊन जाते अशा विभूतींत त्यांची गणना होती.

आपल्या बापाच्या अगदी उलट सुलतान कुतुबुद्दीन शाह खिलजी याचे हजरत निजामुद्दीन यांच्याशी चांगले संबंध नव्हते, याचा उल्लेख आधी आलेला आहे. याचे कारण त्याचा मोठा भाऊ खिजरखान हा होता. खिजरखानास त्याने आंधळा करवून सिंहासनापासून वंचित केले होते. हा खिजरखान हजरत निजामुद्दीन यांच्यावर निष्ठा बाळगणाऱ्यांपैकी होता. बादशहा कुतुबुद्दीनला असे वाटत होते, की हजरत निजामुद्दीन यांना खिजरखानाविषयी सहानुभूती आहे. बादशहा त्यांच्याविषयी एवढे वैमनस्य बाळगून होता, की एक फर्मान काढून त्याने लोकांना त्यांच्याकडे गियासपुऱ्यात जाण्यास बंदी केली होती. एवढ्यावरच न थांबता त्याने असाही आदेश काढला, की सर्व साधूंनी व सूफी विद्वानांनी महिन्यातून एकदा त्याच्या दरबारात हजर झाले पाहिजे.

अमीर खुस्रोच्या म्हणण्याप्रमाणे बादशहा अनेकदा असे सांगत असे की जो कोणी हजरत निजामुद्दीन याचे शीर कापून आणील त्याला एक हजार तंक्यांचे बक्षीस दिले जाईल. शेवटी क्रोधातिरेकाच्या भरात त्याने असे फर्मान काढले, की येणाऱ्या चांद्र मासाच्या पहिल्या तारखेस हजरत निजामुद्दीन यांनी त्याच्या दरबारात हजर झालेच पाहिजे. असे न घडले तर त्यांना दरबारात कसे आणावे हे त्याला माहीत आहे. बादशहाचा हा भयानक आणि धीर खचवून टाकणारा निर्णय हजरत निजामुद्दीन यांना

कळविण्यात आला. त्यांनी शांत चित्ताने हा निर्णय ऐकला; कसलीही प्रतिक्रिया व्यक्त केली नाही. काळ पुढे सरकत होता आणि नियत समय जवळ येत होता. नव्या महिन्याचा चंद्र दिसला. आता त्या निर्णायक क्षणाला काही तासच केवळ उरले. दरबारात जाण्यासाठी त्यांना कोणत्याही प्रकारे राजी करणे शक्य झाले नाही. बादशहादेखील आपला निर्णय बदलण्यास तयार होईना. दोघेही आपल्या निर्णयावर खडकाप्रमाणे अविचल राहिले आणि जग त्या नियत क्षणाची वाट बघत राहिले. तो क्षण मात्र आला नाही; उलट बादशहाच्या मृत्यूचा ठरलेला क्षण मात्र येऊन ठेपला. त्याच रात्री सत्तासूत्रे हाती असलेल्या त्याच्या प्रिय खुस्रोखानने निर्दयपणे त्याचा शिरच्छेद केला व त्यांचे शिर हजारखांबी महालाखाली फरशीवर फेकले. *तुगलकनामा* या अमीर खुस्रोच्या मसनवीतील वर्णनावरून कुतुबुद्दीन मुबारक खिलजीच्या वधाची नक्की तारीख कळू शकते. ही मसनवी त्यांनी गियासुद्दीन तुगलकच्या राजवटीच्या काळात लिहिली. ते म्हणतात :

"हिजरी सणाचे सातशे विसावे वर्ष सुरू झाले आणि कुतुबुद्दीनच्या जीवनाचा आधार ढळला. *जमादि-उल्-सानी* या महिन्याचा तो अशुभ चंद्र उगवला. चंद्र इतका बारीक होता, की नखाच्या टोकाप्रमाणे दिसत होता.

तो चंद्र कुतुबुद्दीन मुबारकशिवाय सर्वांना *मुबारक* (शुभ) ठरला."

ज्या घटना आम्हाला ज्ञात झालेल्या आहेत त्यावरून सामान्यजन व प्रतिष्ठित, श्रेष्ठ आणि कनिष्ठ, विद्वान व अडाणी आणि बादशहा व फकीर या सर्वांच्याच हृदयांवर हजरत निजामुद्दीन यांचा केवढा मोठा प्रभाव होता याची कल्पना येते. घोळदार पश्मिनी अंगरख्यात वावरणारा हा कलंदर पुरुष वैभवशाली सम्राटांकडे किंवा जीवनातील सुखसोयींकडे लक्षही न देता परमेश्वरी इच्छेचा स्वीकार करून त्याच्या आदेशांचे पालन करीत आपल्या धर्मशाळेच्या एका कोपऱ्यात संयम आणि समाधानाने राहत होता आणि लोकांच्या हृदयांवर सत्ता गाजवीत होता; त्यांना नीतीचा मार्ग दाखवीत होता, त्यांच्या आत्म्याच्या रोगांवर उपचार करून त्यांना त्यातून मुक्त करीत होता आणि या जगाची रहस्ये त्यांच्यासमोर उघडी करीत होता. आपण स्वतः उपवास करीत होता. मात्र येणाऱ्यांना पोटभर जेवू घालीत होता; आपल्या जवळच्या धान्याचा एक एक दाणादेखील वाटून टाकीत होता. इक्बालने अगदी योग्य म्हटले आहे :

"सारे जग कलंदरांच्या आधीन असते. बादशहांकडूनदेखील त्यांना खंडणी मिळते. त्यांच्या अधिकाराचे पाश चंद्र-सूर्यापर्यंत पोहोचतात. एकांतातदेखील सारे जग त्यांच्या मिठीत असते."

हजरत सुलतान-उल्-मशायख यांना बादशहांचे कसलेही भय नव्हते. फक्त एकदाच ते शाही दरबारात गेले आणि तेदेखील एका धार्मिक समस्येच्या संदर्भात! समस्या होती ती *महिफल-इ-समाअ* (कव्वाली गायनाचा मेळावा) धर्मनियमांस अनुसरून

आहे, की निषिद्ध या संबंधीची. गायनाचे हे मेळावे त्यांच्या धर्मशाळेतील निवासस्थानी नेहमी भरविले जात असत.

हजरत निजामुद्दीन यांच्या शत्रूंनी, तत्कालीन बादशाह गियासुद्दीन तुगलक याचे मन या मेळाव्यांविरुद्ध कलुषित केले आणि यासंदर्भात आपली भूमिका स्पष्ट करण्यासाठी त्यांना दरबारात बोलावले जावे, यासाठी त्यांना तयार केले. "दरबारात जाऊन मेळाव्याचे समर्थन करण्यावाचून हजरत निजामुद्दीन यांच्याकडे अन्य पर्यायच उरला नाही. ते दरबारात गेले. काजी मोहिमोद्दीन काशानी आणि मौलाना फखरुद्दीन जरावीदेखील त्यांच्यासोबत होते. याप्रसंगी नायब हाकिम काजी जलालुद्दीन यांनी उद्धट भाषा वापरली. सारांश हा, की वादविवाद आणि चर्चेला प्रारंभ झाला. उभय पक्षांनी आपापल्या समर्थनार्थ आपले पुरावे स्पष्ट केले. शेवटी काजी जलालुद्दीन यांनी कव्वालींचे हे मेळावे निषिद्ध ठरविणारे फर्मान काढावे, असे बादशहाला सांगितले. परंतु हजरत निजामुद्दीन यांनी त्याला विरोध केला. बादशहानेदेखील त्यांचे म्हणणे ध्यानात घेऊन फर्मान न काढण्याचे ठरविले. या एका प्रसंगाच्या आधी किंवा नंतर अशी कोणतीच घटना आढळत नाही, की जिच्यावरून हजरत निजामुद्दीन शाही दरबारात गेल्याचे दिसून येईल. ही एक परीक्षाच होती आणि ती त्यांनी यशस्वी रीतीने पार केली.

अमीर खुस्रोने हजरत निजामुद्दीन यांच्याशी एवढी जवळीक प्राप्त केलेली होती, की रात्री जेव्हा ते झोपण्यासाठी जात तेव्हा खुस्रोशिवाय अन्य कोणालाही त्यांना भेटण्याची परवानगी नव्हती. यावेळी खुस्रो त्यांना सर्व घडामोडींची माहिती देत. हजरत निजामुद्दीन अनेकदा खुस्रोला सांगत, की "अन्य सर्व लोकांमुळे मी त्रस्त होतो. इतका की, मी स्वतःमुळेदेखील त्रस्त होतो परंतु तुझ्यामुळे मात्र कधीच त्रस्त होत नाही." हजरत निजामुद्दीन यांची खुस्रोवर एवढी कृपादृष्टी होती, की एकदा ते म्हणाले, 'धर्माने अनुज्ञा दिली असती तर, माझ्याच कबरीमध्ये खुस्रोलाही दफन करण्यात यावे, असे मृत्यूपत्रच मी करून ठेवले असते.' त्यांनी खुस्रोला *तुर्कुल्लाह* (परमेश्वराची प्रिय व्यक्ती) ही पदवी प्रदान केली होती व बहुधा याच नावाने ते त्यांना संबोधित असत. अनेकदा खुस्रोला ते *'गजल'* ऐकविण्यास सांगत. एकदा त्यांनी सफाहानींच्या पद्धतीची गजल रचण्यास खुस्रोला सांगितले आणि अशी इच्छा व्यक्त केली, की या गजलेत प्रेम आणि प्रणयाची आग असावी तसेच अश्रूंनी व निःश्वासांनी ती भरलेली असावी आणि केशकलाप व मुखावरील तिळाचे तीत वर्णन असावे. अमीर खुस्रोच्या प्रतिभेची प्रशस्ती करणारी एक रुबाई त्यांनी रचिली ती अशी :

*खुस्रो कि बनज्म व नस्र मिस्लश कमखास्त*
*मिल्कियते मुल्के सुखन आं खुस्रो राऽस्त*
*आं खुस्रो माऽस्त, नासिर खुस्रोनीस्त*
*झीरा कि खुदा नासिर खुस्रो मास्त*

(काव्य आणि गद्य या दोन्ही क्षेत्रांत खुस्रोची बरोबरी करणारे क्वचितच आढळतील. साहित्याचा प्रांत त्याच्याच मालकीचा आहे. हा आमचा खुस्रो आहे; नासिर खुस्रो नाही आणि परमेश्वर स्वतः या खुस्रोचा सहाय्यक आहे.)

एक दिवस हजरत सुलतान-उल्-मशायरव यांच्यासमोर खुस्रो एक गजल गात होते. जेव्हा खुस्रोंनी पुढील शेर म्हटला तेव्हा अत्यंत प्रेमपूर्ण दृष्टीने त्यांनी खुस्रोचे अवलोकन केले आणि हजरत निजामुद्दीन यांना देहभानरहित अवस्था प्राप्त झाली. शेर असा :

*रुख जुल्मा रा नमूद व मरा गुफ्त तूम बीन*
*झी जौक मस्त व बेखबरम की सुखन चेबूद*

(तिने सगळ्यांना आपला मुखडा दाखविला व मला म्हटले, की तू बघू नकोस. या लहानशा गोष्टीने मी मस्त झालो. मला कळेना की हा काय प्रकार आहे?)

अशाच रीतीने एक दिवस, अमीर खुस्रोचे पुत्र हाजी आपल्या वडिलांची एक गजल म्हणून दाखवीत होते. त्यांनी हा शेर म्हटला.

*खुस्रो तू कीस्ती कि दरआई दरीं शुमार*
*कीं इश्क तेग बरसरे मर्दाने दीन जदा अस्त.*

(खुस्रो, तुला महत्व द्यावे असा तू कोण लागून गेला आहेस? इश्कानंतर आपली तलवार धर्मनिष्ठांवरही चालविली आहे.)

हा शेर ऐकताच हजरत निजामुद्दीन यांना एक अवर्णनीय धुंद अवस्था प्राप्त झाली. अमीर हाजीने तोच शेर पुन्हा म्हटला तेव्हा आनंदातिशयाने त्यांनी आपली एक टोपी अमीर हाजीला व दुसरी अमीर खुस्रोला प्रदान केली.

हजरत सुलतान-उल्-मशायरव असेदेखील म्हणत असत, की खुस्रोला बरोबर घेतल्यावाचून मी स्वर्गातदेखील जाणार नाही आणि या तुर्काच्या (खुस्रोच्या) हृदयातील प्रदीप्त अग्नीच्या बळावर परमेश्वराकडून पारितोषिक आणि क्षमा मागेन. हजरत निजामुद्दीन यांची स्तुती करताना एके ठिकाणी आपल्या *'तुर्कुल्लाह'* या पदवीचा अमीर खुस्रो यांनी मार्मिकपणे उल्लेख केला आहे. ते म्हणतात :

*बर जबानत चूं खिताबे बन्दा तुर्कल्लाह रफ्त*
*दस्ते तुर्कुल्लाह गीर-ओ-हम ब अल्लाहशसिपार.*

(आपल्या कृपाळू वाणीने आपण मला *'तुर्कुल्लाह'* म्हटले आहे, तर आता या *तुर्कुल्लाहचा* हात धरून त्याला परमेश्वराच्या स्वाधीन करा.)

हजरत निजामुद्दीन यांनी दिलेल्या *'तुर्कुल्लाह'* या आपल्या पदवीचा, अमीर खुस्रो यांना मोठा अभिमान वाटत असे व हजरत निजामुद्दीनही त्यांना 'तुर्क' म्हणूनच संबोधित असत. एकदा तर त्यांनी पुढील आशयाचा एक शेरच म्हटला.

''माझ्या मस्तकावर करवत ठेवून जरी मला कोणी या तुर्काशी (खुस्रोशी) असलेले संबंध तोडण्यास सांगितले तर मी आपले मस्तक जाऊ देईन पण या तुर्काला सोडणार

नाही.'' या सर्व घटनांवरून अमीर खुस्रोशी हजरत निजामुद्दीन यांचे संबंध किती घनिष्ठ होते व खुस्रोवर त्यांची किती मेहेरनजर होती हे स्पष्ट कळून येते. पण असे असूनही त्यांनी अमीर खुस्रोला *खिलाफत* (परंपरा चालविण्यासाठी देण्यात येणारे प्रमुख शिष्यत्व) मात्र दिले नाही. शम्सुद्दीन याहिया, शेख-नसीरुद्दीन महमूद चिरागेदिल्ली, शेख कुतुबुद्दीन मुनव्वर व मौलाना हिसामुद्दीन मुलतानी या खुस्रोच्या समकालीनांना मात्र हे भाग्य लाभले होते. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते, की हजरत निजामुद्दीन यांच्या मोजमापाप्रमाणे प्रत्येक जण या विशेष अधिकारास पात्र ठरू शकत नव्हता. त्याचे काही नियम होते, काही तत्त्वे होती. प्रथम त्यानुसार पारख केली जात असे, तपासणी केली जात असे आणि नंतरच निर्णय घेतला जात असे. खुस्रोच्या बाबतीतही हजरत निजामुद्दीन यांनी हेच केले. अमीर खुस्रोविषयी त्यांच्या मनात जो जिव्हाळा होता त्याला त्यांनी या निर्णयाच्या आड येऊ दिले नाही आणि त्यांना खिलाफत प्रदान करणे हजरत निजामुद्दीन यांना उचित वाटले नाही.

बुधवार, दिनांक 18 *रबिउल्आखिर* 725 हिजरी, (2 एप्रिल 1325 इ.) ला, दिवसाची शेवटची नमाज आणि सूर्यास्त यांच्या मधल्या काळात हजरत सुल्तान-उल्-मशायरव यांचा मृत्यू झाला. मृत्यूच्या चाळीस दिवस आधीपासूनच एका विचित्र तंद्रीची अवस्था त्यांना प्राप्त झाली होती. या तंद्रीत ते एकदा पढावयाची नमाज अनेकदा पढत, सिज्दा करताना पुनः पुन्हा मान खाली वाकवीत आणि म्हणत, ''मित्राला मित्राशी केलेल्या वायद्याचे स्मरण आहे.'' कधी कधी *'मी खीम व मी खीम व मी खीम'* (आम्ही निरोप घेत आहोत, आम्ही निरोप घेत आहोत आणि आम्ही निरोप घेत आहोत) हा चरण गुणगुणत.

एके दिवशी हजरत निजामुद्दीन यांनी आपल्या सर्व सेवकांना व शिष्यांना बोलावून घेतले आणि सांगितले, ''तुम्ही या गोष्टीला साक्षी राहाल, की जर इक्बाल (त्यांचा विशेष सेवक)ने घरात एक दाणाही शिल्लक ठेवला असेल तर कयामतच्या दिवशी तो परमेश्वराला उत्तरदायी ठरेल.'' वस्तुतः इक्बालने सर्व धान्य वाटून टाकले होते. फक्त काही दिवस मुक्कामाला आलेल्या पाहुण्यांना पुरेल एवढे मात्र शिल्लक ठेवले होते. हजरत सुलतान-उल्-मशायरव यांना जेव्हा हे कळले तेव्हा ते फार नाराज झाले. त्यांनी सर्व फकिरांना व गोरगरिबांना बोलावून घेतले आणि धान्याचे गोदाम उघडण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे करण्यात आले. फकिरांनी व गोरगरिबांनी एक एक दाणा लुटून नेला. हे कळल्यावर हजरत निजामुद्दीन यांना समाधान वाटले. त्यानंतर त्यांनी आपले खलिफा हजरत शेख नसीरुद्दीन महमूद यांना बोलावून घेतले व आपली गोधडी (सूफी संत पांघरत असत), आपला दंडा, कटोरा, आपली नमाज पढण्याची चटई आणि नामजपाची माळ या वस्तू त्यांच्या स्वाधीन केल्या आणि त्यानंतर आपले आवडते प्राण प्राणदात्या परमेश्वराच्या स्वाधीन केले. आज जेथे हजरत निजामुद्दीन यांचा अनेक जीवांचे

आश्रयस्थान असा दर्गा उभा आहे, तेथेच त्यांना दफन करण्यात आले. नंतरच्या काळात सुलतान मोहम्मद तुगलक याने त्यांच्या कबरीवर घुमट बांधला.

अमीर खुस्रोने हजरत सुलतान-उल्-मशायरव यांच्या प्रशंसापर रचलेल्या एक गजलाचा आशय असा :

"तुझा प्याला परमेश्वरी प्रेमासवाने भरलेला आहे व तुझ्या 'खऱ्या' मित्राकडून (परमेश्वराकडून) तुला सतत निरोप मिळत असतात.

तुझ्या 'खऱ्या प्रियकरा'च्या मिलनस्थानाच्या वाटेत या दोन जगांचे अंतर तुला दोन पावलासारखे आहे. तू बाबा फरीद यांची माळ गुंफलीस म्हणून तुला निजाम हे नाव लाभले.

आकाशाने (नियतीने) अनेक पवित्र आत्मे वितळविल्यानंतरच तुझे नाव ठरविले गेले. तुझा दर्गा म्हणजे *किब्ला* (काबा) असून, त्यावर छतावर उडणाऱ्या कबुतरांप्रमाणे *फरिश्ते* (देवदूत) उडत असतात.

जे लोक परमेश्वरी प्रेमाचे वेडे झाले आहेत, त्यांना तुझ्या आनंददायी वाणीने शांती लाभते. तुझा निष्ठावान सेवक झाल्यापासूनच या गुलाम खुस्रोला चिरंजीवन प्राप्त झाले आहे.

हजरत सुलतान-उल्-मशायरव यांनी आपल्या खलिफांची व शिष्यांची जडणघडणच अशी केली होती की त्यांपैकी जो कोणी जेथे कोठे गेला तेथे त्याने त्यांच्या शिकवणुकीविरुद्ध काहीही केले नाही आणि त्यांनी निर्माण केलेल्या परंपरेचे पूर्णतया पालन केले. पावित्र्य आणि स्वच्छता, संयम आणि समाधान, सहानुभूती, धर्म तत्वांचा प्रसार व पवित्र शरीयतचे (इस्लामने घालून दिलेले नियम) पालन, बादशहांविषयी अलिप्तता, पीडितांचे दुःखनिवारण, निराधारांना आधार देणे, असमर्थ व दुर्बलांना सहाय्य करणे, ही त्यांची नित्यांची कार्यपद्धती होती. धर्मासाठी व जगाच्या कल्याणासाठी आवश्यक ते सर्व काही त्यांनी केले आणि स्वतः मात्र लौकिक जीवनातील सुख, समृद्धी, यश, कीर्ती यांपासून कटाक्षाने दूर राहिले. धर्मप्रसारासाठी व परमेश्वरी संदेश सर्वत्र पोहोचविण्यासाठी या खंडप्राय देशाच्या कानाकोपऱ्यात ही शिष्टमंडळी पसरली. या भ्रमंतीत अशा निर्जल वैराण प्रदेशातदेखील त्यांनी प्रवेश केला, जेथे पावलापावलांवर अगणित संकटांना सामोरे जावे लागत होते; परंतु कसोटीच्या क्षणीदेखील त्यांच्या दृढ निश्चयाचे पाय कधी डगमगले नाहीत. कोणी बंगालमध्ये गेला; कोणी दक्षिणेत आपला फकिराचा निवास उभारला; कोणी अयोध्येच्या भूमीत वास्तव्य केले; कोणी पंजाबमध्ये कार्यमग्न राहिला तर कोणी अनेक संकटाशी झगडत दिल्लीतच आपले पाय रोवले. याच खलिफा व शिष्यांविषयी अमीर खुस्रोने म्हटले आहे :

"निष्ठेच्या मार्गावर चालणारे हे जे शिष्य आहेत, त्यांपैकी प्रत्येक जण धर्मप्रांताचा स्वामी आहेत. त्यांची हाक स्वर्गापर्यंत जाऊन पोहोचते. एकांताचा प्रदेश त्यांचा

आहे व हा अमीर खुस्रो त्यांचा गुलाम आहे. परमेश्वर करो व माझेही नाव या सज्जनात राहो आणि माझाही अंतिम निर्णय (*कयामतच्या*वेळी) त्यांच्या बरोबर होवो.''

अमीर हसन सिजझी, अमीर खुर्द आणि मौलाना झियाउद्दीन बर्नी या हजरत निजामुद्दीन यांच्या शिष्यांनी त्यांची शिकवण आणि त्यांचे आदेश, अनुक्रमे, *फवायद-उल्-फवाह, सीर-उल्-अवलिया* व *तारीखे फिरोजशाही* या आपल्या ग्रंथांतून सुरक्षित ठेवले आहेत. त्यांच्या खरेपणाविषयी व अधिकृत स्वरुपाविषयी कोणी शंका घेऊ शकत नाही. या ग्रंथकारांचे वैयक्तिक चारित्रही संदेहाला अवसरून देणारे आहे. या ग्रथांतील कथनांवर विश्वास न ठेवण्याचे काही कारणच नाही! या ग्रंथांत, हजरत निजामुद्दीन यांच्या व्यक्तिमत्वाच्या सर्व पैलूंवर व त्यांच्या जीवनातील प्रत्येक वळणावर विस्ताराने प्रकाश टाकण्यात आला आहे. आजही एक नैतिक आणि आध्यात्मिक सामर्थ्य म्हणून हे व्यक्तिमत्व जाणवते.

हजरत निजामुद्दीन अवलिया यांची कबर गियासपूरमध्येच आहे. मात्र आज हा विभाग त्यांच्याच नावाने 'हजरत निजामुद्दीन बस्ती' म्हणून प्रसिद्ध आहे. जो कोणी तेथे जातो त्याला आपल्या संवेदनांना चकित करणारा एक धक्का जाणवतो. या भागातच थोड्या अंतरावर असलेल्या हुमायूनच्या भव्य मकबऱ्याकडे आपले लक्ष जाते. लोकांच्या दृष्टीने एका प्रेक्षणीय स्थळापेक्षा त्याला अधिक महत्व नाही. उलट हजरत निजामुद्दीन यांचा दर्गा मात्र फकीर व गोरगरीब, निराश्रित व निराधार, रुग्ण आणि आध्यात्मिक प्रवृत्तीच्या व्यक्तींचे आश्रयस्थान आहे. प्रत्येक वर्षी, ठरावीक दिवशी व ठरावीक वेळी, हजरत निजामुद्दीन यांचा उरूस भरतो. धर्म, पंथ, वर्ण व वंशाचे भेदभाव विसरून, जवळचे व दूरचे अनेक लोक या पवित्र कबरीपाशी येऊन याप्रसंगी आपल्या निष्ठेची आदरांजली अर्पण करतात. आणि हजरत निजामुद्दीन यांच्या कृपाप्रसादाने संतुष्ट होतात. हुमायूनचा मकबरा शांत पण खिन्न वाटतो आणि मानवी आशाआकांक्षांच्या पोकळ प्रौढीचे स्मरण देतो.

हजरत निजामुद्दीन अन्य सूफी संतांप्रमाणे पद्धतशीर कवी नव्हते, हे खरे पण त्यांचे जे काही शेर उल्लेखिले जातात. त्यावरून रचनेतील परतत्व-स्पर्शाची मात्र प्रचीती आल्याविना राहत नाही.

हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्या मृत्यूनंतर कमीअधिक पावणेसातशे वर्षे झाली. काळ हळूहळू व निःशब्दपणे पुढे सरकत गेला. किती महिने आणि वर्षे आली आणि गेली. दिवस आणि रात्रींची किती पुनरावृत्ती झाली. सकाळ आणि सायंकाळची किती आवर्तने झाली. कसली कसली स्थित्यंतरे झाली. परिस्थितीने कशी कशी रूपे धारण केली. अनेक राज्यांचा उत्कर्ष झाला तसा विनाशही झाला. अनेक सुलतानांचे व सम्राटांचे वैभव धुळीस मिळाले. अनेक कीर्तीमंतांचे नावही शिल्लक उरले नाही. आपल्या

धारदार तलवारींचे कसब प्रगट करणारे अनेक वीर विस्मरणाच्या गर्तेत अदृश्य झाले. सारांश इतिहासाची किती तरी पाने उलटली. या प्रदीर्घ कालावधीत शांततेची व सुखसमृद्धीची काही मध्यंतरे वगळता अग्निवर्षाव आणि रक्तसिंचनाचीच दृश्ये सर्वत्र दिसतात. परंतु अनेक शतकांपूर्वी प्रज्वलित झालेला हा एक दीप मात्र सतत तेवत राहिला. काळाच्या झंझावाताने त्याचे अस्तित्व नष्ट होऊ शकले नाही. आपल्या चिरंतन तेजोवैभवाने तो उजळत राहिला आणि आजही उजळत आहे. या दीपाचे हे डोळे दिपविणारे तेज आजही भेदभाव, द्वेष, भीती, गर्व, अमानुषता, स्वार्थ, कपट, पाशवी वृत्ती आणि व्यसनाधीनता यांच्या वावटळीशी झुंज देत आहे. अमीर खुस्रो, हजरत निजामुद्दीन अवलियासारख्या महान संतांच्या संगतीत राहिले व त्यांच्यावरील आपल्या निष्ठेने ते त्यांना अत्यंत प्रिय झाले आणि त्यांच्या कृपेस पात्र ठरले. खुस्रोचे अनेकांगी व्यक्तिमत्व आणि त्यांची अनन्यसाधारण प्रज्ञा ही हजरत निजामुद्दीन यांच्या कृपादृष्टीचीच निर्मिती म्हटली पाहिजे. एक श्रेष्ठ कवी, गद्यलेखक, इतिहासकार, संगीतकार, भाषाकोविद, दरबारचा मानकरी, सूफी आणि सर्वात अधिक म्हणजे एक हिंदुस्थानी म्हणून खुस्रोची गणना उत्कृष्ट मानवांत केली जाते. इतिहासात असे दुसरे उदाहरण सापडत नाही. निसर्गाने अत्यंत उदारतेने त्यांना बुद्धी आणि हृदयाची संपत्ती प्रदान केली होती. खुस्रोचे आजोबा (आईचे वडील) इमादुल्मुल्क स्वतः हजरत निजामुद्दीन यांचे शिष्य होते. असे सांगितले जाते, की त्यांनीच वयाच्या आठव्या वर्षी हजरत निजामुद्दीन यांच्याकडे आणले होते. तेव्हापासून हजरत निजामुद्दीन यांची कृपादृष्टी विशेषत्वाने त्यांच्यावर होती. 671 हिजरीमध्ये अमीर खुस्रो रीतसर त्यांच्या निष्ठावंतांच्या वर्तुळात प्रविष्ट झाले आणि त्यांना अधिकच प्रिय बनले. त्यांनी रीतसर सूफीमत अंगिकारले. त्यानंतर दररोज शाहीदरबारात जाण्याचे ते टाळू लागले. ते बादशहांची प्रशंसा करीत, परंतु त्यांच्याविषयीच्या आपल्या कर्तव्याला कधी चुकले नाहीत. ते विलासांच्या व मद्यपानाच्या महफिलीत जात असत. परंतु कोणत्याही निषिद्ध गोष्टीची त्यांनी जवळीक केल्याचा कोणीही समकालीन इतिहासकार चुकूनही उल्लेख करीत नाही. बादशाह व शाहजाद्यांकडून त्यांना भरपूर पारितोषिके मिळत पण ती सर्व गोरगरिबांना व फकिरांना वाटून टाकण्यात येई. विशेष असे, की सर्व थरांतील लोकांत मोकळेपणाने मिसळत व आपल्या फारसी हिंदीच्या संमिश्र रचनांनी उखाण्यांनी, कूट प्रश्नांनी, द्वयर्थी, क्लिष्ट काव्यांनी व विनोदी चुटक्यांनी सर्वांना आनंदित करीत, पण आपल्या गुरूच्यासमोर मात्र मूर्तिमंत विनय व निष्ठेचा पुतळा होत.

# पाच

अमीर खुस्रो यांची प्रतिभा अनेकविध होती; अनेक गुणविशेष त्यांच्यात एकवटलेले होते. त्यांच्या या आगळेपणाचे वर्णन करताना मौलाना शिब्ली म्हणतात:

''खुस्रोप्रमाणे अनेकविध गुणांनी युक्त असलेला अन्य कोणीही गेल्या सहाशे वर्षांत हिंदुस्थानात उत्पन्न झालेला नाही. खरं विचाराल तर इराण व रोमच्या भूमीनेसुद्धा अशा विविधांगी प्रतिभेचे धनी असलेल्या हजारो वर्षांच्या कालावधीत दोन-चार जणांनाच जन्म दिला असेल! केवळ काव्याचे क्षेत्र घेतले तरी खुस्रोच्या काव्यरचनेतील विविधतेने आपण आश्चर्यचकित होतो. फिर्दोसी, सादी, अन्वरी, अर्फी, नजीरी हे काव्याच्या प्रांतातले सम्राट आहेत, यात शंका नाही. परंतु त्या प्रत्येकाचा अधिकार एका विशिष्ट क्षेत्रापुरता मर्यादित आहे. फिर्दोसी *मसनवी*च्या पलीकडे जाऊ शकत नाही; सादी *कसीद्या*ला स्पर्श करू शकत नाही; अन्वरी *मसनवी गजल*च्या वाटेला जाऊ शकत नाही आणि हाफिज अर्फी व. नजीरी *गजल*च्या वर्तुळाबाहेर पडू शकत नाहीत. परंतु अमीर खुस्रोने मात्र *गजल, मसनवी, कसीदा, रुबाई* ही सर्व क्षेत्रे पादाक्रांत केली आहेत; शिवाय *नज्म, मुस्तजाद* (प्रत्येक शेरमध्ये अर्धा चरण अधिक असलेली गजल) आणि विविध रचनाकौशल्यांचा आविष्कार करणाऱ्या लघुकाव्यांची तर गणतीच नाही. (मौलाना शिबली : *शेर-उल्-अजम)*

वरील उताऱ्यात मौलाना शिबलींनी अन्य कवींबद्दल केलेल्या विधानाविषयी मतभेद होऊ शकेल. परंतु खुस्रोच्या संदर्भातील त्यांचे विधान मात्र मान्य करण्यावाचून गत्यंतर नाही. कसीद्याच्या क्षेत्रात ते खाकानीपेक्षा कमी नाहीत व मसनवीच्या क्षेत्रात मौलाना निजामी गंडवीसारख्या उस्तादाच्या ते मागे नाहीत. आणखी असे, की अशा समर्थ कवींच्या तुलनेत उभे ठाकण्याचे धैर्य प्रगट करणारे ते पहिले हिंदुस्थानी कवी आहेत. जेव्हा ते प्रणयाच्या, सौंदर्याच्या गोष्टी करतात तेव्हा सादी, हाफिज व अर्फी यांचीदेखील मने जिंकून घेतात. साहजिकच हाफिज आणि अर्फी या दोघांनीही खुस्रोच्या काव्यसौंदर्याचे गोडवे गायले आहेत. या दोघांनीच केवळ नव्हे, तर अनेक श्रेष्ठ फारसी कवींनी खुस्रोचे गुणवर्णन केले आहे. मौलाना जामी, सायब अस्फहानी, मीर गुलाम अली आजाद बिल्ग्रामी, काबिती निशापुरी ख्वाजा इस्मतुल्ला बुखारी यांसारख्यांचा हे गुणवर्णन करणाऱ्यांत समावेश आहे. यांपैकी कोणी अमीर खुस्रोच्या शेरचा एक चरण घेऊन त्याला आपल्या शेरचा चरण जोडला आहे *(ताज्मीन)* तर कोणी खुस्रोच्या गजलांच्या आधारावर

आपल्या गजला रचल्या आहेत. फैजी आणि हिलाली हे दोघे तर खुस्रोला आपला काव्यक्षेत्रातील गुरूच मानतात. फैजीसारख्या कवीलाही न मोजणाऱ्या गालिबलादेखील खुस्रोपुढे विनम्र व्हावेसेच वाटते. गालिबने आपल्या काही गजला खुस्रोच्या गजला समोर ठेवून रचल्या असाव्यात असे वाटते. हे एक उदाहरण बघा :

खुस्रोच्या एका गजलचा पहिला शेर *(मतला)* असा आहे :

*तंगे नबात चूँ शुद लब बक्शा कि हमची*
*आबे हयात चूँ रुद खीजो क्या कि हम ची*

आणि गालिबच्या एक प्रसिद्ध गजलचा पहिला शेर असा आहे :

*गुंचए नाशिगुफ्ता को दुरसे मत दिखा कि यूँ*
*बोसे को पूछता हूँ मुँहसे मुझे बता कि यूँ*

दोन्ही गजलांची लय तीच आहे, *काफिया* (अंत्ययमकापूर्वीचा शब्द) तोच आहे फक्त गालिबने *'हमची'* व *रदीफ* (अंत्ययमक)चे भाषांतर आपल्या गजलमध्ये केलेले आहे. इराणचा श्रेष्ठ कवी हाफिज आणि खुस्रोच्या काही गजलांतही साम्य आढळते. खुस्रोचा काळ हाफिजच्या आधी येतो. हाफिजचा मृत्यू खुस्रोनंतर सत्तावन वर्षांनी झाला. खुस्रोची कविता त्या काळातही हाफिजपर्यंत पोहोचली असणे अगदीच असंभवनीय नाही. तसे घडले असेल तर हाफिजवरही खुस्रोचा प्रभाव पडल्याचे नाकारता येणार नाही.

अशारीतीने सर्वकाळी खुस्रोचे स्थान सुप्रतिष्ठित असलेले व सर्व मोठे कवी त्यांच्या व्यक्तिमत्वाकडे आकर्षित झालेले दिसून येते. सामान्यजनांनी त्यांना हातोहात झेलले, तर प्रतिष्ठितांनी त्यांना डोक्यावर घेतले; सूफींच्या महफिलीत ते *शमा* (ज्योत) बनून राहिले, तर संत सज्जनांनी त्यांना आपल्या महफिलीच्या अध्यक्षपदी आरूढ केले आणि बादशहा व शाहजाद्यांनी त्यांची योग्य कदर केली. अमीर खुस्रोंना सर्व थरांत हे मानाचे स्थान मिळाले याचे कारण त्यांच्या हृदयाची विशालता, दृष्टीची व्यापकता, वाणीची मनोज्ञता आणि त्यांच्या आंतरिक व्यथेची उत्कटता यातच दडलेले आहे.

या ठिकाणी अमीर खुस्रो यांच्या विविधांगी व्यक्तिमत्वाच्या सर्व पैलूंवर प्रकाश टाकून त्यांचे स्वरूप निश्चित करणे शक्य नाही, तसेच त्यांच्या कलागुणांचे व काव्यवैशिष्ट्यांचे सर्वांगीण विवेचन करणेही शक्य नाही. यांपैकी काहींचा संक्षेपाने परिचय करून देणे व इतरांचा केवळ निर्देश करणेच येथे शक्य आहे. वस्तुस्थिती मात्र अशी आहे, की त्यांच्या व्यक्तिमत्वाचा आणि कलात्मकतेचा प्रत्येक पैलू सविस्तर समीक्षणाच्या पात्रतेचा आहे. यासंदर्भात प्रथम जर कोणती गोष्ट आपले लक्ष वेधून घेत असेल, तर ती त्यांची गजल रचना होय! पण त्यांच्या गजलांचे मूल्यमापन करण्यापूर्वी खुस्रो पूर्वकालीन हिंदुस्थानातील फारसी गजलाच्या स्वरुपाचे संक्षेपाने विवरण करणे उचित व आवश्यक वाटते.

वस्तुस्थिती अशी आहे, की *गजल* मग ती फारसी असो वा ऊर्दू, केवळ एक वाङ्मयप्रकार नसून, ती एक वृत्ती आहे, मानवी मनाचे एक विशिष्ट वळण आहे. गजल म्हणजे भावनाधीन असा एक चिंतन प्रकार आहे, जाणिवेचा एक असा आविष्कार आहे, की जो आपोआप स्वरलयीचे बंधन स्वीकारतो. गजलला आत्म्याची वाणी आत्म्याचे संगीत म्हटले तर वावगे ठरू नये! फारसी आणि उर्दूतील बहुतेक सूफी गूढवादी कविताही गजलच्या आणि केवळ गजलच्याच रुपात प्रगट झालेली आहे. गजलकार प्रत्यक्षात सूफी असेलच असे नव्हे. सूफीच्या वाटेने तो गेला नसेल, त्यांची उपासनापद्धती त्याने अनुभवली नसेल; त्यांच्या आत्मिक अनुभूतींची त्याला ओळख नसेल तरी पण आपल्या वृत्तीने व प्रकृतीने तो सूफीच असतो; त्यालाही अज्ञाताचे साक्षात्कार होतात; आत्मिक व्यथा-वेदनांच्या माधुर्याने व तीव्रतेने तोही धुंद होत असतो; वियोगाच्या दुःखाने तोही होरपळत असतो व मीलनाच्या उत्कट आनंदाने देहभान हरपत असतो. गजलला एक प्रकारची गुंतागुंत आणि स्वयंगती हवी असते; मनाची पकड घेणारी शैली हवी असते; एक प्रकारची संमिश्र मनोवृत्ती हवी असते आणि एक प्रकारचे वेडेपण व कलंदर वृत्तीही हवी असते. गजलमध्ये ज्या निरीक्षणांना व अनुभवांना सामावले जाते, ते बहुधा बुद्धीच्या आटोक्यातील नसतात आणि प्रत्येकाला त्यांचा आस्वाद घेता आलाच पाहिजे असेही नव्हे. याच कारणाने गजलवर विस्कळीतपणा, अस्पष्टपणा आणि कल्पनेच्या संमिश्रतेचा आरोप केला जातो. खरं असं आहे, की आपल्या आविष्कारासाठी गजल ज्या भाषेचा अवलंब करते ती कसीदा आणि मसनवीच्या भाषेपेक्षा मूलतःच भिन्न असते. ती ज्या प्रतिमांचा शोध घेते, जी प्रतीके वापरते, ज्या उत्प्रेक्षांचा उपयोग करते आणि निवेदनाच्या ज्या शैलीचा अवलंब करते त्यांचा उद्देश जाणिवेच्या तळाचा व अंतरंगाच्या खोलीचा शोध घेणे हा असतो. तिला संवेदनांच्या तारांना झंकारित करावयाचे असते. आणि आकलनाचे सर्व कोपरे प्रकाशित करावयाचे असतात. केवळ बुद्धीने या सर्वांचे यथार्थ ज्ञान होऊ शकत नाही; तर्कशास्त्राचे नियम येथे लागू पडत नाहीत आणि ज्ञान क्षेत्रातील घटपटादी मार्ग येथे थिटे पडतात. फारसीतील मौलवी मानवीच्या गजला यांचे चांगले उदाहरण म्हणता येतील.

गजलचा प्रत्येक शेर दिसायला सुटा, स्वतंत्र, अन्य शेरांशी आंतरिक संबंध नसलेला वाटतो आणि त्यामुळे असे वाटते, की एकाच गजलमध्ये विविध प्रकारचे अनेक विषय हाताळले गेले आहेत. पण हे गजलचे वैगुण्य नसून वैशिष्ट्य आहे. *कसीदा* आणि *मसनवीमध्ये* कोणतीही गोष्ट सांगण्यासाठी विस्ताराची आवश्यकता असते तर गजलचे सौंदर्य तिच्या अल्पाक्षरत्वात असते. ती सुरईत नदीचा प्रवाह सामावून घेते आणि केवळ एका चरणाने परिच्छेदांचे काम भागविते. याच कारणामुळे गजलचे हजारो चरण सुभाषितांप्रमाणे, म्हणींप्रमाणे समाजाच्या सर्व थरांतील लोकांच्या तोंडी बसलेले असतात. यावरून गजल रचणाऱ्या कवीच्या अडचणींची कल्पना येऊ शकते. मानवी भावनांचा

असा गोळीबंद स्वरुपातील आविष्कार वाटतो तसा सोपा नसतो. विस्तार सोपा असतो पण संक्षेप मात्र कठीण असतो.

गजलमधील या भिन्न पातळ्यांच्या अस्तित्वाचे कारण विशिष्ट राजकीय परिस्थिती देखील आहे. फारसी गजलचा इतिहास, तिची परंपरा आणि तिचा विकास सादीपासून रीतसर सुरू होतो. त्याआधी कसीदा आपल्या उत्कर्ष बिंदूला पोहोचला होता आणि तसे होणे स्वाभाविकही होते. कारण कसीदा या वाङ्मयप्रकाराचे नाते, अमिरी, समृद्धी, आर्थिक सुबत्ता, सामाजिक स्थिरता, शांतता आणि मानसिक स्वस्थतेशी जडलेले आहे. इ. स. 1258 मध्ये मंगोलांकडून बगदादचा झालेला पराभव ही एक अत्यंत भयानक व आश्चर्यविमूढ करणारी घटना होती. या घटनेने सुखी व समृद्ध जीवनाचा पायाच उखडून टाकला. सादीने हा हृदयभेदक विध्वंस आणि विनाश आपल्या डोळ्यांनी बघितला होता. आता न सुलतान उरला होता न बादशहा; न दरबार उरला होता न दरबारचे मानकरी; न महाल उरले होते न दिवाणखाने आणि न कवी उरले होते न त्यांचे काव्य! सर्वत्र एक भीषण शांतता पसरली होती. कसीद्याचा उद्घोष मंदावला होता; वैचारिक गोंधळाच्या या वातावरणात दडपला गेला होता. वैचारिक संगती संपली होती. माणसांची मनोवस्था विचित्र झाली होती. कसीद्याला हे वातावरण मानवणारे नव्हते व झालेही तसेच! पण असे असले तरी मानवी भावभावनांना, विचारांना आविष्काराची वाट तर हवीच होती. आता त्यांत एक प्रकारचा धारदारपणा, तीक्ष्णपणा आला होता. या परिस्थितीत कवीने गजलचा आश्रय घेतला आणि आपली अव्यक्त मनोव्यथा एका निराळ्या रुपात प्रगट करू लागला. परिणामतः मनाची अस्वस्थता व स्वैरता, जीवनाची अस्थिरता, प्रेयसीच्या जुलमाच्या तक्रारी, आशा आणि निराशा, वियोगाचे दुःख आणि मिलनाची उत्कंठा व पलायनवादी वृत्ती हे गजलचे आवडते विषय बनले. हाफिजच्या गजला याचे उत्तम उदाहरण होत.

हिंदुस्थानात, मंगोलांनी केलेला हा विध्वंस कोणाच्या अनुभवाला आला नसला तरी, एक परंपरा म्हणून गजल येथेही जशीच्या तशी स्वीकारली गेली. येथेही काही कमीअधिक करून त्याच विषयांवर गजला रचल्या जाऊ लागल्या. या काव्यरचना प्रकाराला येथेही लोकप्रियता लाभली आणि पुढील काही शतकांत अनेक अशा कवींनी आपल्या गजलांनी साहित्याच्या मैफिलीची रंगत वाढविली, ज्यांचा अभिमान वाटावा. या कवीपैकी बहुतेक जण हिंदुस्थानात वास्तव्य केलेले होते.

हिंदुस्थानात फारसी शायरी, गजनवींच्या बरोबर आली आणि तिचा पायरव प्रथम लाहोर शहराच्या वातावरणात कानी आला. मसूद साद सलमान हा या भूमीतील पहिला कवी दृष्टोपत्तीस येतो. त्याच्याबद्दल असे सांगितले जाते, की त्याने अरबी व हिंदी भाषेतील काव्यरचना केली होती; पण त्याच्या हिंदी काव्याचा एकही नमुना उपलब्ध नाही.

या काळातील दुसरा उल्लेखनीय कवी अबुल्फर्जरूनी हा होय. हा पुष्कळ दिवस

लाहोरात राहिला होता आणि सुलतान इब्राहीम गजनवीचा समकालीन होता, असे म्हणतात. केव्हा एका शाही फर्मानानुसार मसूद साद सलमान याला कैद करण्यात आले तेव्हा हा लाहोरला पळून आला (त्याच्या कवितांचा संग्रह *दीवान* इराणमध्ये प्रकाशित झाला आहे.) या काळात आणखीही काही कवी असतील परंतु त्यांची कसलीच माहिती मिळत नाही. *कसफ-उल्-अजूब* या सूफी तत्वज्ञानावरील प्रसिद्ध ग्रंथाचे लेखक हजरत दातागंज बख्श अली हजवीरी देखील याच काळातील होत. त्यांचे शेर त्यांच्या गद्यरचनेत विखुरलेले आहेत. या आधारावर त्यांना हिंदुस्थानातील सूफी कवितेचे हिंदुस्थानातील आद्य प्रवर्तक म्हणावयास हरकत नही. हे कवी केवळ एखाद्या काव्यप्रकारापुरते मर्यादित नव्हते. त्यांनी कसीदे लिहिले, मसनवी लिहिल्या आणि रूबाया आणि गजलांच्या क्षेत्रातदेखील आपली लेखणी चालविली.

महमद घोरीच्या आगमनानंतर लाहोरचे केंद्र बदलून दिल्लीला आले आणि योगायोगाने याच काळात पश्चिमी आशियातील इस्लामी राजवटी मंगोलांच्या वावटळीने थरथरत होत्या. मुसलमानांचे शेवटचे आश्रयस्थान जे बगदाद, तेथील महाल आणि राजवाडे जमीनदोस्त झाले होते. या परिस्थितीत, मुसलमान सूफी, विद्वान, धर्मशास्त्री कवी व साहित्यिकांनी बहाऊन व ऊचा येथे आश्रय घेतला. यांपैकीच शहाब महमरा हा एक कवी होता. कविराज म्हणून त्याला मान्यता होती. हजरत निजामुद्दीन अवलियांचा शिष्य असलेला शम्सुद्दीन दबीर हा दुसरा एक प्रसिद्ध कवी याच काळात होता. अमीर खुस्रोंना त्याच्याविषयी आदर होता. असे म्हटले जाते, की खुस्रोंनी *हश्त बहश्त* ही आपली *मसनवी,* तिच्यात सुधारणा करवून घेण्याच्या हेतूने शम्सुद्दीन दबीर यांच्याकडे दिली होती. पण या सर्व कवींच्या रचना काळाच्या ओघात सुरक्षित राहू शकल्या नाहीत. अमीद सनामी या एका कवीची रचना केवळ उपलब्ध आहे. या कवीचे पूर्ण नाव, मलिक-उल्- कलाम अमीर फख्रूद्दीन अमीदसनामी असे असून, आपल्या आयुष्यात तो काही काल राज्याच्या हिशेबविभागाचा प्रमुख अधिकारीही राहिला होता.

हे सर्व कवी या ना त्या नात्याने दरबाराशी संबंधित होते, पण काही असेही होते जे रीतसर कवी नसले तरी शेर मात्र रचीत असत. हजरत ख्वाजा मोइनुद्दीन चिश्ती आणि हजरत कुतुबुद्दीन बख्तियार काकी यांच्या कवितांचे *दीवान* (संग्रह) आहेत, की नाहीत याची शंका असली तरी हे दोघेही शेर रचीत असत, ही गोष्ट सर्वमान्य आहे. हजरत बाबा फरिदुद्दीन गंजशकर यांचे शिष्य हजरत कुतुबुजमल हासवीदेखील कवी होते. जियाबख्शी देखील याच काळात होते. प्रसिद्ध सूफी बअलीशाह कलंदर पानिपती देखील खुस्रोचे समकालीन होते आणि त्यांची मसनवी, *मन्तक-उल्-तैर* गाजलेली आहे.

लाहोरपासून दिल्लीपर्यंत आणि गजनींच्या राजवटीपासून गुलाम वंशापर्यंत विस्तारलेल्या या कविपरंपरेतील जे कवी उत्कर्षाला पोहोचले, त्यांच्या यादीत अमीर खुस्रोचे नाव सर्वप्रथम येते. पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणे, त्यांनी विविध वाङ्मयप्रकारांच्या

क्षेत्रात आपल्या प्रतिभेचे विलास प्रगट केले आणि गजलच्या क्षेत्रात तर ते सर्वांच्या पुढे निघून गेले. इराणमध्ये, सादी आणि हाफिज यांच्या दृष्टीने गजल हा एक नवा प्रयोग, पण हिंदुस्थानात मात्र तिचे आगमन एका परंपरेच्या स्वरुपात झाले. अमीर खुस्रोंच्या गजलांमधून मात्र प्रयोग आणि परंपरा यांचे विलक्षण मिश्रण आढळते आणि त्यामुळेच फारसी गजलकारांच्या पहिल्या रांगेत त्यांना स्थान मिळाले. त्यांना स्वतःलाही आपल्या या महत्त्वाची जाणीव होती. ते म्हणतात :

"खुस्रोंचा शेर बागेतील पक्ष्यांनी गायला. दुःखाने निर्जीव होऊन जो कोणी बागेत आला त्याला नवजीवन मिळाले.

जर शेर ऐकायचा असेल तर या गरीब खुस्रोकडून ऐका. जगात त्याच्यासारखा दुसरा कवी नाही."

गजलला गजलत्व येण्यासाठी ज्या वैशिष्ट्यांची आवश्यकता असते ती सर्व खुस्रोच्या गजलमध्ये आहेत व त्यांचा उल्लेख पूर्वी करण्यातही आलेला आहे. आवेग आणि दाहकता, भावनांची उत्कटता, मिलनातील आनंद, वियोगातील वेदना, इष्काच्या परिणामांची भीषणता आणि या सर्व अनुभूतींतून निर्माण झालेली तीव्र संवेदनशीलता हे सर्व काही त्यांच्या गजलमध्ये आहे. हजरत सुल्तान-उल्-मशायरव यानी एकदा अमीर खुस्रोंना सफाहानींच्या पद्धतीनुसार शेर रचण्यास सांगितले होते, त्यावरूनही ही गोष्ट स्पष्ट होते. हजरत निजामुद्दीन अवलिया त्यांना अनेकदा आपली गजल ऐकविण्यास सांगत. खुस्रोंना बाह्यरुपाचे सौंदर्य चांगलेच अवगत होते. सावळा वर्ण, काळ्या रात्रीसारखा विस्तीर्ण लांब केशकलाप, गालांची ताबूस छटा, फुलांसारखे ओठ आणि मोहक विभ्रमांचे त्यांना आकर्षण आहे. ते म्हणतात :

"तू आपल्या डोळ्यांतून प्रेमाचा दृष्टिक्षेप करावास, हे किती चांगले आहे! पापण्या वर उचलाव्यास आणि खोडसाळपणाला वाट मोकळी व्हावी."

"प्रेयसीला एकांतात आपली व्यथा कथन करण्यात किती आनंद वाटतो! आणि तिच्या ओठावर दाबल्या जाणाऱ्या दातांनी होणारी वेदना किती सुखावह असते!" "बागेत तुझ्या शेलाट्या अंगकाठीसारखे एकही सुरूचे झाड नाही कारण चालणारे सुरूचे झाड कोठे बरे सापडणार?"

"आमचे हृदय आमच्या हातून निसटले आहे. हे आमच्या प्रेयसीला कोण बरे सांगणार? आणि आमच्या अंतरंगाची वेदना प्रत्यक्ष औषधासमोर कोण वर्णन करणार?" "मी रात्रभर रक्तात बुडालेला असतो आणि ती मात्र स्वप्नात दंग असते. जिथे ती आहे तेथे माझी अवस्था कोण निवेदन करणार?

हजरत निजामुद्दीन अवलियांच्या निष्ठावंतांच्या वर्तुळात रीतसर प्रविष्ट होण्यापूर्वी देखील खुस्रो गजल रचीत होते. यावेळी त्यांनी रचलेल्या गजलादेखील प्रेमांची व्यथा-वेदना, सौंदर्याची जाणीव आणि इष्काच्या भीषण परिणामांपासून अलिप्त नाहीत.

त्यांत कमाल इस्फहानीपेक्षा सादीचा प्रभाव दिसून येतो. परंतु हजरत निजामुद्दीन यांच्या अद्‌भुत प्रभावाने सोन्याला सुगंध प्राप्त करून दिला; त्यांच्या प्रेरणेला व प्रतिष्ठेला अनुकूल भूमी लाभली; त्यांच्या डोळ्यांच्या व कानांच्या माध्यमाने होमणाऱ्या सौंदर्यप्रचीतीचा विकास झाला आणि त्यांना संसारत्यागाचा नव्हे, पण स्वार्थत्यागाचा धडा मिळाला. परिणामतः त्यांच्या कलंदर वृत्तीने नवनवीन टप्पे सर केले. यायंदर्भात त्यांच्या काही शेरांचे निरीक्षण मनोरंजक वाटण्यासारखे आहे :

"हे उद्‌ध्वस्त अवशेष भुताच्या स्वाधीन करून टाकावेत आणि आपण देवदूतांप्रमाणे उंच आकाशात उड्डाण करावे, अशी वेळ आता आली आहे."

"हे देहभान हरपणाऱ्या सूफींनो! प्रेमिकासारखे एखादे नृत्य करा म्हणजे या जुनाट निळ्या आकाशात बिछायत तुमच्या पावलांखाली अंथरली जाईल."

"अभावाचा खेळ शौर्याने प्रारंभ करू आणि या आकाश समुद्राला त्याचे उत्तरही सांगू."

"सूर्याप्रमाणे भ्रमण करीत आम्ही आकाशात जाऊ; किती झालं तरी वाऱ्याच्या लहरीवर नाचणारे आम्ही धूलिकण थोडेच आहोत?"

"भाग्याने प्रेमसंबंधाची शिडी बनविली आहे. ती तिच्या आधारे आकाशाच्या किल्ल्यातील भूमीवर आम्ही पाय रोवावेत म्हणूनच!"

"आपल्या प्रेमाच्या हाताने आपले वैराग्यवस्त्र फाडून *कयामत* (अंतिम निर्णयाचा दिवस) च्या उन्हात त्यांचा ध्वज उभारू"

"हे हृदया! जागा हो. कारण *इष्क* म्हणजे काही स्वप्न नव्हे. हजरत मुहमद मुस्तफा सलिअल्लाह अलिया वसलमच्या (महंमद पैगंबर) कृपेवर विश्वास म्हणजेच *इष्क* होय. महंमदी धर्म (इस्लाम) परमेश्वरापर्यंत तुझे मार्गदर्शन करणारा आहे. आम्ही प्राणपणाने आपल्या गुरूच्या पावलांवर पाऊल टाकून चालले पाहिजे."

असे सांगतात, की हजरत निजामुद्दीन अवलिया एकदा सकाळी आपल्या खोलीतून बाहेर आले तेव्हा रात्रभर केलेल्या प्रार्थनेमुळे व उपासनेमुळे त्यांच्यावर एक प्रकारची धुंदी आलेली होती; डोळ्यांत लाली पसरलेली होती. खुस्रो त्यावेळी तेथेच होते. त्यांनी उत्स्फूर्तपणे हा शेर म्हटला, "तुम्ही धुंदीत आहातसे वाटते. डोळ्यांत अजून लाली आहे. कोणाच्या संगतीत सारी रात्र जागविलीत?"

सूफीमताकडे प्रारंभापासून खुस्रोचा ओढा होता. साहजिकच *तोहफा-उल्-सफर* या त्यांच्या दीवानात असे शेर आढळतात, ज्यांत सूफी वातावरण आहे. सय्यद हसन गजनबी आणि सादीच्या व्यासंगातून हा प्रभाव खुस्रोच्या कवितेत उतरला होता. परंतु हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्या सहवासाचे भाग्य लाभल्याने त्यांच्या विचारांत व कल्पनेत उज्ज्वलता आली. या सहवासाचा प्रारंभ गियासुद्दीन बल्बनच्या राजवटीत झाला होता.

परंतु या संबंधाला दृढता प्राप्त झाली, ती मात्र सुलतान जलालुद्दीन खिलजीच्या काळात. परिणामतः खुस्रोच्या सर्व काव्यांत सूफी वृत्ती प्रभावी दिसून येते. आता केशकलाप आणि कपोलाचे अर्थ बदललेले दिसून येतात; पाखंड आणि इस्लाम यांनी काही निराळेच सूचित होऊ लागले; चषक आणि मद्य यांचा उपयोग वेगळ्याच पार्श्वभूमीवर केला जाऊ लागला; डोळे आणि भुवयांचे उल्लेख काही निराळेच सांगू लागले आणि मद्यपी व धर्मपंडित यांनी आपला वेष पालटून टाकला. खुस्रोने आपल्या गजलांना एक दीर्घकालीन आशय व अर्थ दिला आणि 'परमेश्वरी सृष्टीवर प्रेम करणे' या केंद्राभोवती ते फिरत राहिले. या दृष्टीने त्यांच्या काही शेरांचा पुढे दिलेला आशय बघण्यासारखा आहे :

"आम्ही आहोत आणि प्रिय व्यक्तीचे प्रेम आहे; मग काबा असो, की मंदिर, प्रेमिकांना पाखंड व धर्मनिष्ठा यांच्याशी काही कर्तव्य नसते."

"मी प्रेमिक आहे; जर तू माझ्या प्राणांना हाक देशील तर माझा सखा माझ्या छातीतून उत्तर देईल, की मी आहे."

"जर तुझे सौंदर्य जगासाठी कृपेची खूण असेल तर माझा वध करण्यासाठी एवढी चर्चा व तक्रार का?"

"तू आपल्या मुखावर आच्छादन (नकाब) का घातले आहेस? ते लपलेले राहू शकत नाही आणि अनाच्छादित झाल्यावर शरीर प्राणहीन होऊन जाते."

"इष्काच्या मस्तीची तुला जाणीव कशी नाही? इष्काच्या मस्तीचा जो ज्ञातास्वाद नाही त्यालाच हे शक्य आहे."

"आनंदी असणाऱ्यांबरोबर घालविलेला काळ इष्कावाचून गेल्यामुळे वाया गेला. मस्त असणाऱ्यांचा जो दिवस जाणिवेचा असतो तो अशुभ असतो."

"एक पाय तू आपल्या प्राणांवर ठेव व एक पाय आपल्या प्रिय व्यक्तीच्या गल्लीत ठेव. प्रेमाच्या वाटसरूसाठी याहून अधिक चांगली चाल दुसरी नाही. ज्या प्रेमिकाला आपल्या प्रिय व्यक्तीचे दुःख प्राणांपेक्षा अधिक वाटत नाही तो केवळ स्वतःचाच प्रेमिक असतो."

"हे प्रेमिकांनो! मित्रभावाने प्राणांचा त्याग करा आणि मग प्रिय व्यक्तीच्या अनाच्छादित मुखाचे दर्शन अनुभवा."

"जो माणूस प्रेमिकांच्या अवस्थेला हसतो त्याच्या अवस्थेने रडू येणेच आवश्यक होय."

"इष्काच्या गुन्ह्यामुळे जग जर मला *काफिर* (पाखंडी) म्हणत असेल तर खुशाल म्हणू देत. पश्चात्ताप व्यक्त करण्यासाठी मी एकदाही तोंड उघडणार नाही."

"इष्क दुर्दैवाची खूण समजली जाते पण प्रेमिकांच्या दृष्टीने ते चिरंतनाचे सुदैव होय."

वरील उताऱ्यात खुस्रोने ज्या इष्काच्या व ज्या प्रेमिकाचा उल्लेख केला आहे तो नेहमीपेक्षा निश्चितच वरच्या पातळीवरचा आहे. या इष्काचा संबंध विश्वव्यापी अशा परमेश्वरी प्रेमाशी जोडला गेला आहे. या प्रेमात शत्रूदेखील शत्रू राहत नाही; मित्र तर मग मित्र असतोच! परमेश्वराला ओळखण्याच्या सूफीमताच्या वाटेवरील हे असे ठिकाण आहे, की जेथे या प्रकाशवृक्षाला फांद्या फुटतात आणि त्यांच्या शीतल छायेत थकलेले, हरलेले, दुर्दशा झालेले व उद्ध्वस्त झालेले मानवी प्रवासी विसावतात व सुखावतात.

अमीर खुस्रोने तसे तर कसीदेही लिहिले, मसनवीही लिहिल्या आणि अन्य रचनाप्रकारही हाताळले, पण ते सर्व त्यांनी बहुधा इतरांसाठी तसेच स्वतःच्या योगक्षेमासाठी केले. मात्र आपल्या स्वतःसाठी आत्मसमाधानासाठी जर त्यांनी काही लिहिले असेल तर त्या फक्त गजलाच होत. त्यांच्या गजला म्हणजे त्यांच्या मनाचा आरसाच होत; त्यांतून त्यांचा आत्मा बोलत असल्याचे जाणवते. याच कारणामुळे खुस्रोंना मूलतः गजलचे कवी म्हटले तर अस्थानी ठरू नये. त्यांनी भविष्यातील हिंदुस्थानी कवींसाठी फारसी गजलरचनेचे स्वरूप व तिची शैली निश्चित करून दिली. उपमा-रुपकांचे नावीन्य, भाषेचे सौंदर्य व तिची परिणामकारकता, म्हणींचा व वाक्यप्रयोगांचा आकर्षक उपयोग, भावनांची व कल्पनांची कोमलता, शैलीची सफाई आणि निवेदनाचे साधेपण ही खुस्रोच्या गजलांची अशी उठून दिसणारी वैशिष्ट्ये आहेत, की ज्यांच्या बळावर त्यांनी फारसी कवितेच्या *'सिबक हिंदी'* ची पायाभरणी केली.

फारसी शायरीचे *'सिबक हिंदी'* या नावाने ओळखले जाणारे हे जे नवे वळण निर्माण झाले त्याचे काही विशेष मान्य झालेले आहेत. वैचारिक गूढता आणि अर्थाची गुंतागुंत, रचनाकौशल्य, कल्पनेच्या स्वैर भराऱ्या, अर्थचमत्कृती, अपरिचित वर्णने आणि तात्त्विक भूमिका ही 'सिबक हिंदी' रचना पद्धतीची वैशिष्ट्ये समजली जातात. कमालीची अतिशयोक्ती आणि अन्य कलाकुसरींचा उपयोग हीच कवितेच्या श्रेष्ठतेची गमके मानली जाऊ लागली.*

परिणामतः असे दिसून येते, की काव्य आणि गद्य दोहोंनाही या साखळ्यांनी जखडून टाकले. *मसनवी* आणि *कसीदा* हे रचनाप्रकार प्राधान्याने या नव्या प्रवाहाने प्रभावित झाले आणि बहुतेक हिंदुस्थानी कवींचे काव्यरचनेचे प्रयत्न याच दिशेने झाले. परिणाम असा झाला, की साहित्य साहित्य राहिले नाही; काव्य काव्य राहिले नाही; त्याला एखाद्या कोड्याचे, कूट रचनेचे स्वरुप प्राप्त झाले. रचनेची सरलता नावाला उरली नाही. काव्याचे सौंदर्य चमत्कृती आणि रचना कौशल्यापुरतेच मर्यादित झाले. ज्या गुणसमुच्चयातून श्रेष्ठ साहित्याचा जन्म होतो त्याचा मागमूसही राहिला नाही.

---

* *'अमीर खुस्रो और सिबक हिंदी'*, प्रा. अमीर हसन आबिदी जोय अन्सारी व अबुज फैज सहर यांनी संपादित *'खुस्रो शिनासी'* या ग्रंथातील लेख.

खुस्रोच्या कसीद्यांत, मसनवींत आणि गद्यलेखनात सिबक हिंदीचे उपयुक्त विशेष भरपूर आहेत; परंतु आम्ही जेव्हा त्यांच्या गजलांकडे वळतो तेव्हा मात्र आश्चर्याला सीमा राहत नाही. खुस्रो जेव्हा अन्य वाङ्मयप्रकाराचा अवलंब करतात तेव्हा त्यांचा आवेश आणि अभिमान त्यांतून जाणवतो पण तेच खुस्रो जेव्हा गजलाच्या दरबारात येतात तेव्हा मात्र मूर्तिमंत लीनतेचे रूप धारण करतात; त्यांच्या कपाळी दीनता व खिन्नता असते; त्यांची दृष्टी खाली वळलेली असते; त्यांच्या ओठात कंप दडलेला असतो आणि त्यांच्या संपूर्ण अस्तित्वावर एक धुंदी चढलेली असते, त्यांना देहभानरहित अवस्था प्राप्त झालेली असते. ते आपल्या गजलांतून सौंदर्य आणि प्रेमाविषयी सांगतात; केशकलाप आणि रंगरुपाच्या गोष्टी करतात; ओठ आणि मुखड्याची वर्णने करतात; सूफींच्या विचारसरणीतील परमेश्वर चिंतनातील गूढ आणि सूक्ष्म गोष्टी स्पष्ट करतात. तत्त्वज्ञान व विविध विचारप्रणालींच्या आकलनात रमतात आणि हे जग व या जगातील रहस्यांना आपल्या लेखणीचा विषय बनवितात परंतु कोठेही गजलची कोमलता व सरलता दुरावली जात नाही. सिबक हिंदीचे प्रवर्तक म्हणून त्यांच्या गजलांत गुंतागुंत, अस्पष्ट आणि कूटमयता अपेक्षित होती परंतु या दोषांपासून त्या सर्वस्वी मुक्त आहेत. याच कारणामुळे खुस्रोचे शेर कानाला स्पर्श करताक्षणी खोलवर आत्म्याला जाऊन भिडतात.

अमीर खुस्रोच्या गजलांचे पाच *दीवान* (संग्रह) उपलब्ध आहेत त्यांची नावे अशी :

*तोहफत-उल्-सगर, वस्त-उल्-हयात, गुर्रत-उल्-कमाल, बकियानकिया* आणि *निहायत-उल्-कमाल.* उपर्युक्त पाचपैकी पहिल्या चार संग्रहांना स्वतः खुस्रोनेच अनुक्रमे, पृथ्वी, आप, वायू आणि तेज या चार मूलतत्त्वांची उपमा दिलेली आहे. भावार्थ असा, की पहिल्या दीवानमधील गजला मातीप्रमाणे थंड, शुष्क, जड आणि दुबळ्या आहेत. रचना कौशल्याच्या दृष्टीनेखील त्यांची हीच स्थिती आहे, जडतेकडे त्यांचा ओढा आहे. त्यांच्या दृष्टीने दुसऱ्या म्हणजे *वस्त-उल्-हयात* या दीवानमधील गजला पाण्याप्रमाणे हलक्या-प्रवाही व मातीपेक्षा वरच्या श्रेणीतील असून, बोजड शब्दयोजनेचा दोष त्यांत नाही. त्या ऊबदारही आहेत व ओल्याही आहेत. तिसरा *दीवान गुर्रतउल्कमाल* वाऱ्याप्रमाणे आहे. या *दीवानमधील* गजला अधिक अलवार व अधिक प्रवाही व अधिक सरस आहेत. कमालीचा हळुवारपणा त्यांत असल्यामुळे त्यांत कोठेही अडखळल्यासारखे होत नाही. या गजला वाऱ्याप्रमाणे गरम आणि ओलावा असलेल्या व पाण्याप्रमाणे हळुवार आणि प्रभावी आहेत आणि आंतरिक तेजावर त्यांचे पोषण झालेले आहे. चौथ्या *दीवान बकिया नकियामधील* गजलांचे स्वरूप अग्नीसारखे आहे. अग्नीची झेप सतत वरच्या दिशेला असते, अधोगती त्याला मानवत नाही; कोणतीही वृत्ती त्याच्यापेक्षा उंचावर जाऊ शकत नाही व त्याच्यापर्यंतही पोहोचू शकत नाही. यामुळे अग्नीचा स्वभावधर्म असलेली उष्णता मृदु हृदयावर कापसावर ठिणगी पडावी तसा परिणाम मात्र करते व कठीण हृदयांना मृदु

बनविते व जाळून राखही करून टाकते. (*बकियानकिया* या *दीवानची* खुस्रोलिखित प्रस्तावना)

पहिला *दीवान तोहफत-उल्-सगर 671* हिजरीमध्ये सिद्ध झाला व त्यात काव्य रचनेला प्रारंभ केल्यापासून वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत खुस्रोनी लिहिलेल्या गजला समाविष्ट आहेत. दुसरा *दीवान वस्त-उल्-हयात 683* हिजरीमध्ये तयार झाला. आपल्या वयाच्या विसाव्या वर्षापासून एकतिसाव्या वर्षापर्यंत लिहिलेल्या गजला खुस्रोनी यात समाविष्ट केल्या आहेत. तिसरा *दीवान* हिजरी सन 692 मध्ये वयाच्या चाळीसाव्या वर्षी त्यांनी मूर्तरूपास आणला. शेवटच्या *निहायत-उल्-कमाल* या *दीवान*मध्ये त्यांच्या आयुष्याच्या अंतिम सात वर्षातील गजलांचा समावेश असून, 725 हिजरीत तो पूर्ण झाला. अमीर खुस्रोचा मृत्यूही त्याच वर्षी झाला.

इ. स. 1963 मध्ये तेहरानहून सईदनफीसी यांनी संपादित केलेला खुस्रोच्या संपूर्ण गजलांचा *दीवान*, *दीवान-इ-कामिल अमीर खुस्रो देहेलवी* या नावाने प्रकाशित झाला असून, त्यात एकूण 1726 गजला आहेत.

## *मसनवी*

वस्तुतः फारसी मसनवीलेखनाच्या क्षेत्रात फिरदोसी आणि मौलाना निजामी गंडवी यांना चिरकालीन कीर्ती प्राप्त झालेली आहे आणि आजही त्यांचे नाव आदराने घेतले जाते परंतु अमीर खुस्रोने जसे एकीकडे गजलची व्याप्ती वाढविली तसेच मसनवीच्या नव्याने झालेल्या उत्कर्षाचेही श्रेय त्यांचेच आहे. त्यांच्या मसनवीचे निरीक्षण केल्यास ही वस्तुस्थिती पूर्णपणे स्पष्ट होते. *खम्सा* अथवा *पंजगंज* या नावाने ओळखली जाणारी त्यांच्या मसनवींची मालिका म्हणजे या दिशेने उचललेले मोठे धैर्याचे पाऊल होय आणि खुस्रोच्या उंचीच्या माणसाला हे पाऊल टाकणे शक्य होते. त्यांच्या पूर्वीच निजामीसारख्या श्रेष्ठ व कुशल कवीने मसनवीसाठी लागणारे सारे मूलद्रव्य वापरून टाकले होते. जे काही उरले सुरले होते त्यातूनच खुस्रोला आपली पक्कान्ने सिद्ध करून *दस्तख्वान* संजवायचे होते. मौलाना निजामीची त्यांनी बरोबरी केली असे म्हणणेही योग्य होणार नाही. कारण स्वतः खुस्रोंनीच त्यांची श्रेष्ठता व त्यांचे गुरुस्थान मान्य केले आहे.

या ठिकाणी अमीर खुस्रोच्या प्रत्येक मसनवीचे सविस्तर विवेचन करणे व त्यांतील सौंदर्य स्थळे प्रगट करणे शक्य नाही. त्यांच्या मसनवींच्या संक्षिप्त परिचयावरच येथे समाधान मानणे भाग आहे.

रचनाकालाच्या दृष्टीने त्यांची पहिली मसनवी *कुरान-उल्-सआदेन* ही होय. ही 688 हिजरीत लिहिली गेली आणि यात एक ऐतिहासिक घटना वर्णन करण्यात आली आहे. या मसनवीची शेर संख्या 3944 आहे. केवळ सहा महिन्यांच्या अल्प कालावधीत ही पूर्ण झाली. ही मसनवी खुस्रोंनी सुलतान मोइजोद्दीन कैकुबादच्या आदेशावरून

लिहिली. परंतु असे दिसते, की ही मसनवी बघण्याइतकी सवड मृत्यूने सुलतानास दिली नाही. या मसनवीला *मसनवी दर तारीफे देहली* असेही एक नाव आहे.*

यानंतर *690* हिजरीमध्ये आपली दुसरी ऐतिहासिक मसनवी रचण्यास प्रारंभ केला. ही मसनवी, *मफ्ताह-उल्-फतूह* किंवा *ताज उल् फतूह* किंवा *फतेह-उल्-फतूह* किंवा *फतेहनामा* या नावाने ओळखली जाते. यावेळी सुलतान फिरोजशाह जलालुद्दीन खिलजी राज्यावर आलेला होता व या मसनवीत त्याच्या राजवटीच्या पहिल्या वर्षातील घटनांचे वर्णन आहे. या मसनवीमधील शेरांची संख्या पहिल्या मसनवीच्या तुलनेत विशेष नसल्यामुळे खुस्रोंनी तिचा समावेश *गुर्रत-उल्-कमाल* या आपल्या तिसऱ्या मसनवीत केला आहे. इतर मसनवीप्रमाणे या मसनवीला स्वतंत्र ग्रंथाचे रूप दिलेले नाही.

असे दिसते, की *मफ्ताह-उल्-फतूहच्या* रचनेनंतर सात वर्षे खुस्रोंनी मसनवी लेखनाकडे लक्ष दिलेले नाही. हिजरी सन *698* मध्ये मात्र, खुस्रोंना मौलाना निजामी *गञ्जीच्या* बरोबरीचे स्थान प्राप्त करून देणाऱ्या मसनवींच्या मालिकेस प्रारंभ झाला. त्या काळात *खम्सा* या मौलाना निजामींच्या पांच मसनवींच्या संग्रहाला तशाच रचनेने उत्तर देणे म्हणजे फारसी काव्य व साहित्याच्या श्रेष्ठतेचे गमक समजले जात होते. अमीर खुस्रो आणि मौलाना अब्दुल रहमान जामी यांच्या खमस्यांना मौलाना निजामीनंतरच्या काळात दीर्घकालीन कीर्ती लाभली. पण त्यातही अमीर खुस्रोच्या खमस्यांचे स्थान श्रेष्ठ समजले जाते. हे खमसे (पाच चरणांच्या कडव्यांनी युक्त अशी काव्यरचना) जवळपास तीन वर्षात लिहिले गेले व त्यांच्या शेरांची एकूण संख्या *17910* आहे.

या मालिकेतील पहिली मसनवी *मत्ला-उल्-अन्वर* ही होय. या मसनवीत एकूण *3324* शेर असून, केवळ दोन आठवड्यांच्या अल्पावधीत तिची रचना पूर्ण झाली. हिचा लेखनकाल हिजरी सन *698* होय. मसनवीत एखादी ऐतिहासिक कथा नाही की एखादी कल्पित कथाही नाही. हिचा संबंध नैतिक व सूफी विचारांशी आहे. या मसनवीत अमीर खुस्रोने विद्वानांना आपल्या कर्तव्याची व प्रतिष्ठेची कल्पना दिलेली आहे अशी तंबी देण्यात आलेली आहे, की आपली लेखणी त्यांनी असत्याच्या आविष्काराचे साधन बनवू नये, पैगंबराची तलवार सैतानाच्या हाती देऊ नये. बादशहाला प्रसन्न करण्यासाठी त्याच्या बालिश बडबडीलाही इस्लामच्या पंथप्रवर्तकाच्या वचनांचा मान देणाऱ्या, श्रीमंतांच्या लबाडीला माना डोलावणाऱ्या व उमरच्या न्यायालाही पक्षपात ठरविणाऱ्या दिखाऊ विद्वानांकडे खुस्रोने योग्य रीतीने अंगुलीनिर्देश केला आहे. त्यांनी, कृतीची साथ नसलेल्या ज्ञानाची लाजिरवाणी अवस्था वर्णन केली आहे; लोकांच्या वर्तनाची तक्रार केली आहे आणि अशा सूफींचाही उल्लेख केला आहे. जे *पश्मिना* (सूफी साधूंचा रेशमी अंगरखा) वापरतात पण *अजाँ* (प्रार्थना) चा आवाज मात्र त्यांच्या कानापर्यंत पोहोचत

*नवाझ महमद इसहाक खान संपादित *वरतीबे कुल्लियाते अमीर खुस्रो*मधील शेख अहमद यांचा लेख.

नाही. सारांश हे शेख (धार्मिक नेते) असे असतात, की ज्यांच्या हाती सोन्याची पाणकोंबडी असते. प्रश्न असा आहे, की स्वतः तुमच्यामध्ये कोणते गुण आहेत? या मसनवीत खुस्रोंनी अपत्यांना वळण लावण्याचा विषयही हाताळला आहे. त्यांच्या दृष्टीने मुलींचे शिक्षणही अत्यंत आवश्यक आहे, कारण शुद्ध शिंपेवाचून मोती निर्माण होत नाही.

या मसनवीतील विविध निसर्ग वर्णनांवरून खुस्रोंच्या निसर्ग वर्णनकौशल्याची प्रचीती येते. विशेषतः रात्र, अरुणोदय, वसंत ऋतू व शिशिर ऋतूंची वर्णने करण्यात ते अत्यंत यशस्वी ठरले आहेत.

*शीरीन खुस्रो* ही या मालिकेतील आणि रचनाकालाच्या दृष्टीनेही दुसरी मसनवी होय. हीत एक अर्ध-ऐतिहासिक कथा वर्णन करण्यात आलेली आहे. हिचा लेखनकाळ हिजरी सन *698* असून शेरांची संख्या *4124* आहे. या मसनवीत खुस्रोने युद्ध आणि विलास व इष्क आणि सौंदर्य यांचे पुरेपूर वर्णन केलेले आहे. पण त्याबरोबरच तीत तत्त्वज्ञानातील जटिल प्रश्न आणि शहाणपणाच्या गोष्टीही आढळतात. तसेच धर्मवचनांची संगती लावून अधिकारवाणीने दिलेले निर्णयही दिसून येतात. जगाची नश्वरता, कालाचे परिवर्तन, शिष्टाचार व सामाजिक जीवन आणि शिक्षण व सुधारणा हे विषयही प्रसंगोपात येथे हाताळले गेले आहेत. येथे मानवी भावनांचे चित्रण आहे; निसर्गदृश्यांचे आरेखन आहे आणि हृदयद्रावक दुःख व सूफीमत आणि परमात्मा संबंधातील रहस्येही आहेत. मानवी भावभावनांच्या वर्णनातील अमीर खुस्रोच्या सामर्थ्याचीही या मसनवीवरून कल्पना येते. रचनाकौशल्याचा उपयोगही येथे अत्यंत समर्थपणे करण्यात आलेला आहे. गूढता, दृष्टांत मालिका, काव्यलिंग अलंकार, अतिशयोक्ती व शब्दचमत्कृतींची अनेक उदाहरणे या मसनवीत जागोजागी आढळतात. *शीरीन खुस्रो* संबंधी लिहिताना मौलवी अलीअहमदखान असीर कादरी बदायूनी यांनी म्हटले आहे :*

> "अमीर खुस्रोंच्या साहित्यनिर्मितीचे मोठेपण यात आहे, की त्यांनी आपल्या नावीन्यप्रियतेच्या बळावर, एका शोकात्मिकेला नैतिक उपदेशाचे व वाङ्मयीन गुणांच्या खाणीचे रूप दिले आहे. या कारणामुळेच प्रारंभापासून शेवटपर्यंत प्रत्येक कथेच्या संदर्भात जगाची नश्वरता, परिस्थितीतील स्थित्यंतरे, अधिकारवाणीने केलेले उपदेश, सूफीविचारांचे विवेचन, धर्मवचनांची चर्चा, मद्याचे दुष्परिणाम, स्वार्थी व लोभी वृत्तींचे दोष, राज्य शासनाचे नियम, समाजाचे कायदे, न्याय आणि फिर्याद यांचे गुणविशेष, जोरजबरदस्तीचे दुष्परिणाम, परमेश्वराच्या प्रार्थनेचे आदेश, धर्माची आवश्यकता व इस्लामची वैशिष्ट्ये यांचा प्रभावी आविष्कार झालेला आहे.

---

* ***अमीर खुस्रो : अहवाल*** *व आधार*, या डॉ. नरुल हसन अन्सारी संपादित ग्रंथातून.

खुस्रोच्या खमस्यातील तिसरी मसनवी आहे *मज्नू लैला.* हीदेखील 698 हिजरीतच लिहिली गेली. या वर्षात त्यांनी उपर्युक्त तीन मसनवी लिहिल्या. या तिन्हीमधील शेरांची एकूण संख्या दहा हजार चाळीस भरते. मौलाना निजामींची *लैला मज्नू* ही मसनवी आहे. खुस्रोने तीच कथा निवडली पण नाव मात्र थोडे बदलून *'मज्नू लैला'* असे स्वीकारले. या मसनवीत 2660 शेर आहेत असे स्वतः खुस्रोने नोंदले आहे. परंतु उपलब्ध हस्तलिखितात मात्र एकूण शेर 2608 च आहेत; बहुधा बावन शेर काळाच्या ओघात लुप्त झाले असावेत.

लैला-मज्नूची कथा एक भीषण शोकांतिका असल्याचे सर्वज्ञात आहे. अपयश आणि निराशा व विनाश आणि उद्ध्वस्तता यांचीच ही कथा होय. या कथेची ऐतिहासिकता योग्य आधारांवाचून शंकित असली तरी अरबी, फारसी व उर्दू साहित्यात या कथेला जी सार्वत्रिक कीर्ती व मान्यता लाभलेली आहे ती क्वचितच अन्य एखाद्या कथेला लाभली असावी. मौलाना निजामींनी या कथेला काव्यरूप दिले. मात्र खुस्रो कसे बरे तिच्याकडे दुर्लक्ष करणार? त्यांनीही या क्षेत्राला आपल्या कल्पनेच्या वारूला गती दिली. इश्काचा रंगढंग, वियोगाचे तीव्र दुःख, प्रेयसीच्या मिलनाची, दर्शनाची आशा, शोकाचा आवेग, निःश्वास नि आक्रोश, वैराण वाळवंटातील भटकंती, मनाची सैरभैर स्थिती, भयग्रस्तता, वेडाची अवस्था व अंगावरील कपड्यांच्या चिंध्या करणे, लोकांची सहानुभूतीरहित निर्दय वागणूक, ताटातूट व निराशा आणि अखेरीस भयानक व हृदयद्रावक शेवट. या सर्व घटनांचे आणि अवस्थांचे खुस्रोने प्रस्तुत मसनवीत आकर्षक चित्रण केलेले आहे व आपल्या काव्यकलेचे आणि कल्पनांचे दर्शन घडविलेले आहे. लैलाच्या सौंदर्यवर्णनाचा प्रसंग असो, की वसंत ऋतू वा शिशिर ऋतूच्या वर्णनाचा, एखाद्या घटनेचे निवेदन असो, की भावनात्मक गुंतागुंतीचे प्रगटीकरण, प्रत्येक ठिकाणी खुस्रोंची सहजताच जाणवते. सत्याचे व परमात्म संबंधाचे विवेचनही यात आले आहे. वस्तुतः या प्रेमकथेत या विषयांच्या विवेचनाला सकृतदर्शनी काही अवसर दिसत नाही. परंतु खुस्रोंनी आपल्या मर्मग्राही बुद्धीने या विषयांसाठी योग्य वाट शोधून काढली आहे. ज्ञानाचे महत्त्व आणि त्याची कसोटी, उद्विग्नतेचे रहस्य, धैर्याने लाभणारी प्रतिष्ठा, वडिलकीचा लाभ, नियमरहितेची निंदा व सततचे प्रयत्न इत्यादी विषयांवर खुस्रोंनी या मसनवीत आपले विचार प्रगट केले आहेत.

*आईन-ए सिकंदरी* ही खुस्रोंच्या खमस्यामधील चौथी मसनवी असून, *सिकंदरनामा* या मौलाना निजामीच्या मसनवीच्या अनुकरणातून तिचा जन्म झाला आहे. खुस्रोंनी उल्लेख केल्याप्रमाणे या मसनवीत 4450 शेर असावयास हवेत, परंतु उपलब्ध हस्तलिखिती 39 शेर कमी आहेत. बहुधा कालप्रवाहात ते समर्पित झाले असावेत. या मसनवीचा लेखनकाल हि. 699 आहे. आपल्या *आईन-ए सिकंदरी* मध्ये, सिकंदरच्या व्यक्तिमत्वाच्या, त्याने मिळविलेल्या विजयांच्या व केलेल्या विध्वंसाच्या कोणत्या अंगावर

आपली लेखणी उचलावी हा खुस्रोपुढे बिकट प्रश्न होता; कारण साऱ्या महत्वाच्या अंगांचा मौलाना निजामींनी आपल्या सिकंदरनाम्यात आधीच उपयोग करून घेतला होता. जे उरलेसुरले होते त्यावरच समाधान मानणे खुस्रोंना अपरिहार्य होते. त्यातूनच त्यांना आपल्या कलात्मकतेचा आविष्कार करणे भाग होते. या *मसनवीच्या* वाचनानंतर असे दिसून येते की अमीर खुस्रोंनी आपल्या नावीन्यप्रिय वृत्तीद्वारे अशी क्षेत्रे धुंडाळली आहेत, ज्यात त्यांच्या कल्पकतेने मनोहरता निर्माण केली आहे. परिणामतः ही मसनवीदेखील सिकंदरनाम्याच्या तुलनेला उतरणारी अशी झाली आहे.

परमेश्वराची प्रार्थना, महंमद पैगंबराची स्तुती, त्यांना ईश्वरीज्ञान झाले तो प्रसंग, बादशहाची प्रशंसा, युद्ध, प्रातःकालचे वर्णन, सायंकालीन वातावरण, एखाद्या घटनेचे चित्रण, मैफलींची व निसर्गाची वर्णने अशा सर्व विषयांना खुस्रोंनी हात घातला आहे. वस्तुतः ही मसनवी दिसायला युद्धांच्या व विलासांच्या वर्णनांवर उभारलेली असली तरी त्यातही वाचकाला उपदेश व नीतिविचार आढळतात. परिश्रम, कौशल्य, धर्माचे पालन, सत्य व सदाचरण यांचे महत्त्व खुस्रोंनी वाचकाच्या मनावर बिंबविण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. येथेही त्यांनी, सुखलोलुप व लोभी विद्वानांना क्षमा केलेली नाही. या मसनवीत हिंदुस्थानी रीतिरिवाज व येथील जीवनातून स्फुरलेल्या, इथल्या परंपरेशी संबद्ध असा कल्पनाविलासही आढळतो.

खमस्यातील पाचवी व शेवटची मसनवी *हश्त बहिश्त* ही होय. ही मसनवी हि. सन. 701 मध्ये रचण्यात आली असून, तिच्या शेरांची संख्या 3350 आहे. या मसनवीत बहराम गौरशी संबंधित सात काल्पनिक कथा वर्णन करण्यात आल्या आहे. या सातही काल्पनिक कथा म्हणजे खुस्रोची स्वतंत्र निर्मिती होय. बहराम गौरला सहली, शिकारीचा अत्यंत नाद होता. या नादापासून त्याला परावृत्त करण्यासाठी त्याच्या शहाण्या वजीराने, सात देशाच्या राजकन्या मिळविल्या होत्या. प्रत्येक राजकन्या आपल्या कथा निवेदनाने बहराम गौरला गुंतवून ठेवते, अशी या मसनवीची रचना आहे. या कथा काल्पनिक असल्या तरी खऱ्या वाटाव्यात अशा रीतीने सांगितल्या गेल्या आहेत. *मसनवीचे* सौंदर्य वाढविणारी सर्व वैशिष्ट्ये या मसनवीतही आहेत. ईशस्तवन, पैगंबरप्रशंसा, पंथप्रमुखांचे आदर्श आचरण, सुलतान अलाउद्दीन खिलजीला केलेला उपदेश, आपल्या मुलीला केलेला उपदेश इत्यादी या मसनवीचे विशेष कार्यविषय होत. बहरामचे धैर्य आणि शौर्य, प्रातःकालवर्णन, सायंकाल वर्णन, प्रेमिकेचे सद्‌गुण, उद्याने व वालुकामय प्रदेश इत्यादींचे वर्णन करताना खुस्रोने अप्रतिम कौशल्य दाखविले आहे. यात वापरलेल्या उपमा, उत्प्रेक्षांचे वेगळेपण खुस्रोच्या नवनिर्मितीक्षम कल्पकतेचे प्रत्यंतर आणून देते. याशिवाय खुस्रोने मसनवीच्या उपयुक्ततेकडेही दुर्लक्ष केलेले नाही. या कथा केवळ मनोरंजनार्थ रचण्यात आलेल्या नसून, उच्च नैतिकता निर्माण करणे; माणसाला चांगला माणूस बनविणे व श्रेयप्राप्तीच्या सुप्तशक्ती जागृत करणे हे त्यांचे उद्दिष्ट होय. या कथांत असा

हितोपदेश दडलेला आहे, की ज्यामुळे सामाजिक नैतिक आणि सांस्कृतिक जीवन सुधारले जाऊ शकेल. मानवाने जर विवेक आणि दूरदृष्टीचा उपयोग केला आणि विवेकाची कास धरली तर तो आपले मन सुधारू शकतो, आपली बुद्धिमत्ता विकसित करू शकतो, प्रगतीच्या मार्गावर मानवी समाजाचे नेतृत्व करू शकतो आणि मानवी सभ्यता उज्ज्वल करून संस्कृतीचे क्षितिज विस्तारू शकतो.

खुस्रोच्या *'खमसा'* या पाच मसनवींच्या संग्रहाचा हा परिचय होय. एक काळ असा होता की जेव्हा निजामीचे अनुकरण हा फारसी काव्याचा मानदंड मानला जात असे. परिणाम तर अनेकांनी निजामीला अनुसरून मसनवी लेखन केले. अमीर खुस्रो, अब्दुल रहमान जामी, नवाई व फजुली यांना या परंपरेत विशेष कीर्ती लाभली, परंतु त्यातही निजामीनंतरचे स्थान जर कोणाला लाभले असेल तर ते अमीर खुस्रोलाच! केवळ तीन वर्षांच्या कालावधीत आपल्या काव्यसंपत्तीने *पंजगंज*रूपी खजिना तुडुंब भरून टाकला. जवळपास अठरा हजार शेर खुस्रोने या मसनवीत रचले आहेत. निजामीच्या खमस्याची शेर संख्या अठ्ठावीस हजार आहे. मौलाना निजामींनी वापरलेल्या छंदांचाच खुस्रोनेही वापर केलेला आहे. किंबहुना, खुस्रोच्या इतर मसनवींचाही विचार केला, तर त्यांनी निजामीपेक्षा दोन वेगळे छंद अधिक वापरले आहेत. या कारणांमुळेच श्रेष्ठ कवींनी निजामीबरोबरच खुस्रोचाही उल्लेख केलेला आहे. इराणचे प्रसिद्ध लोकप्रिय कवी हाशमी, मक्तबी शीराझी, नवाई, हलाई जामी, अब्दुबे व फजुली यांसारख्यांनी खुस्रोचा गौरव केलेला आहे.

सारांश, अन्य वाङ्मयप्रकारात खुस्रोची बरोबरी करणारा कोणी नाही हे तर खरेच, पण मसनवीमध्येदेखील त्यांनी खूपच उंची गाठलेली आहे. त्यांच्या मसनवीत साधेपणा आणि सफाईदारपणा बरोबरच एक विशेष आवेग आणि परिणामकारकता, मनोज्ञता व मनोहरता जाणवते. त्यांच्या वर्णनांची सहजता, भाषेचा अवखळपणा, शब्दयोजनेचे औचित्य, रचनेतील मार्दव, विचारांची सुसूत्रता, वाणीचे प्रवाहित्व, दृष्टांतांचा चटकदारपणा, उपमांची यथायोग्यता आणि उपदेशांची यथार्थता व मधुरता यांचा विलक्षण संगम झालेला असून, रसिकांना त्यापासून आनंद व समाधान लाभते.

### *'देवलरानी खिजरखान' मसनवी*

हिजरी सन 701 मध्ये आपल्या 'खमसा' मधील *हश्त बहिश्त* ही मसनवी पूर्ण केल्यानंतर, मसनवीच्या क्षेत्रातील त्यांचे दुसरे कर्तृत्व, हि. सन 715 मध्ये त्यांनी लिहिलेल्या *देवलरानी खिजरखान* या मसनवीच्या रुपाने प्रगट झाले. मध्यंतरीच्या या चौदा वर्षांच्या काळात अलाउद्दीन खिलजीच्या हि. स. 711 पर्यंतच्या यशस्वी युद्धांचे वर्णन करणाऱ्या *खजायन-अल्-फतूह* या मसनवीव्यतिरिक्त अन्य कोणतीही गद्य अथवा पद्यरचना उपलब्ध नाही. सतत चौदा वर्षे खुस्रोसारखा विपुल लेखन करणारा माणूस

गप्प बसला असेल असे वाटत नाही. कदाचित हा काळ त्यांच्या दरबारी जीवनाचा व राजकीय घडामोडींचा असल्याने असे घडले असावे. कदाचित, *जवाहरे खुस्रवी* या नावाने संकलित व प्रकाशित झालेल्या त्यांच्या संग्रहातील सात छोट्या पुस्तकांचे लेखन याच काळात झाले असेल. *देवलरानी खिजरखान* ही *मसनवी, इष्किया आशकिया* आणि *आशिका* या नावांनीही ओळखली जाते. अलाउद्दीन खिलजीचा मुलगा शाहजादा खिजरखान आणि गुजरातच्या राजाची कन्या देवलरानी यांची ऐतिहासिक प्रेमकथा या मसनवीत काव्यबद्ध करण्यात आली आहे. या मसनवीत उल्लेख केल्याप्रमाणे, स्वतः खिजरखानने सूचना केल्यावरून अमीर खुस्रोने तिची रचना केली व सर्व संबंधित माहितीही मिळविली हे स्पष्ट होते. ही मसनवी खुस्रोने चार महिने व काही दिवसांत लिहिली आणि 6 जिल्काद 715 हिजरीला पूर्ण केली. त्यावेळी तिच्यात एकूण 4200 शेर होते; परंतु खिजरखान इत्याचींचा वध झाल्यानंतर अमीर खुस्रोने 319 शेरांची भर घातली व अशा रीतीने एकूण शेर संख्या 4519 झाली.

एका ऐतिहासिक प्रेमकथेवर प्रस्तुत मसनवी आधारलेली असून, हिंदुस्थानी वातावरणाचे तिच्यात उमटलेले पडसाद हा तिचा एक महत्त्वाचा विशेष होय. हिंदुस्थान आणि हिंदुस्थानी वस्तुंविषयी अमीर खुस्रोंना वाटणारे आकर्षण आणि प्रेम त्यांच्या विविध लेखनांतून जागोजागी प्रगट झाले आहे. या मसनवीतही ते घटक उपस्थित आहेत. हिंदुस्थानचा इतिहास, येथील हवामान, सभ्यता आणि संस्कृती आणि रूढी व परंपरा यांचे अनेक उल्लेख आढळतात. हिंदुस्थानी भाषा ते फारसीपेक्षा कमी प्रतीची मानीत नाहीत. त्यांच्या दृष्टीने अरबी ही सर्व श्रेष्ठ भाषा होय. ज्याप्रमाणे अरबी भाषा अन्य भाषांतील शब्दांच्या मिश्रणापासून मुक्त व शुद्ध आहे, त्याचप्रमाणे हिंदीदेखील शुद्ध आहे. हिंदी भाषेतील शब्दांची विविध रूपे व त्यांचा वापर करण्याची शक्ती अरबीपेक्षा कमी नाही; अर्थवत्तेच्या दृष्टीनेही हिंदी उणी नाही अशी त्यांची भूमिका होती. हिंदुस्थानी कापडांपैकी, देवगिरी येथे तयार होणारे व त्याच नावाने ओळखले जाणारे कापड अत्यंत तलम म्हणून प्रसिद्ध असलेल्या *कतान* या कापडाहून नाजूक असल्याचे त्यांनी म्हटले आहे. विड्याचे पान, आंबा आणि अंजीर व येथील फुलांपैकी जाई, जुई, केवडा, चाफा इत्यादींचा या मसनवीत उल्लेख आलेला आहे. येथील सौंदर्यवतींना जगतातील सुंदर स्त्रियांपेक्षा श्रेष्ठ ठरविताना ते म्हणतात, की त्यांच्या केशकलापाचे कुरळेपण आकर्षक आहे; मिसर, रोम, कंधार, समरकंद, तुर्कस्तान व चीनमधील सुंदरी हिंदुस्थानातील लावण्यवतींसमोर अत्यंत कमी प्रतीच्या ठरतील.

या मसनवीत कल्पनाविलासदेखील भरपूर आहे. लाल महालात देवलरानीचे दर्शन पूर्व दिशेला उगवलेल्या चंद्रासारखे त्यांना वाटते. खिजरखानांच्या विवाह समारंभात उधळलेल्या मोत्यांना प्रेयसीच्या दाराशी प्रेमिकाने ढाळलेल्या अश्रूंची ते उपमा देतात. रूपवतींच्या नाजुकपणाचे अतिशयोक्तीने वर्णन करताना ते सांगतात, की मोत्यांवर

चालून त्यांच्या पायाला फोड आले होते. या दृष्टीने ही मसनवी कलात्मक सौंदर्याच्या कसोटीवर पूर्णपणे उतरते.

*नहसिपहिर* ही मसनवी अमीर खुस्रोंनी 718 हिजरीच्या *जमादि-उल्-अव्वल* या महिन्यात लिहून पूर्ण केली. यावेळी त्यांचे वय 65 वर्षांचे होते व मुबारकशाह खिलजीच्या राजवटीचे ते तिसरे वर्ष होते. या मसनवीचे दुसरे नाव *सुलताननामा* असेही आहे. या मसनवीची नऊ प्रकरणे असून, प्रत्येक प्रकरणास *सिपहिर* म्हटले आहे. या मसनवीचे एक वैशिष्ट्य असे, की तिच्या प्रत्येक प्रकरणात वेगळ्या छंदाचा वापर करण्यात आलेला आहे, म्हणजे ही मसनवी नऊ छंदात लिहिलेली आहे.

*नहसिपहिर* चा विषय ऐतिहासिक असून, अमीर खुस्रोंची ही चौथी ऐतिहासिक मसनवी होय. आपला प्रशंसाविषय सुलतान कुतुबुद्दीन मुबारकशाह खिलजी याच्या इच्छेवरून खुस्रोंनी ही मसनवी लिहिली आहे. मसनवीच्या प्रास्ताविकात *हम्द* (ईशस्तवन) नात *(महम्मद पैगंबराची स्तुती) मेराज* (महंमद पैगंबरास ईश्वरी तेजाचे दर्शन) व हजरत सुलतान-उल्-मशायरव यांची स्तुती यांचा समावेश आहे. पहिल्या प्रकरणात मुबारकशाह खिलजीचा राज्यारोहण समारंभ आणि देवगिरीच्या बंडाचे तपशीलवार वर्णन आहे. दुसऱ्या प्रकरणात दिल्लीच्या इमारती व तेलंगण्यातील आणि वरंगलच्या युद्धाचे वर्णन आहे; तसेच 'दिल्लीची महानता' व *साकीनामा* या शीर्षकांखाली काही शेर असून, एक गजलही आहे. तिसऱ्या प्रकरणात हिंदुस्थानची प्रशंसा, येथील भिन्नभिन्न प्रदेश, येथील फुले, पक्षी व पशू, हिंदुस्थानातील धर्मविद्या, येथील भाषा, संस्कृत भाषेचे प्राचीनत्व आणि देवगिरीच्या हरपाल देवाच्या वधाचे वर्णन आहे. चौथ्या प्रकरणात बादशहा, युवराज, अमीर, श्रीमंत, सैनिक व प्रजाजन यांना उपदेश करण्यात आला असून, शेवटी एक गजल आहे. पाचव्या प्रकरणात बादशहाच्या शिकारीचे वर्णन असून, त्यात धनुष्य व बाण यांतील काल्पनिक संवाद व शेवटी साक्षीनामा आणि एक गजल आहे. सहाव्या प्रकरणात मुबारकशहाचा मुलगा शाहजादा मोहम्मद याच्या जन्माचा वृत्तांत असून, साक्षीनामा व एक गजल आहे. सातव्या प्रकरणात वसंत ऋतू, नववर्षदिन, मोहम्मदाचा जन्मोत्सव आणि नाचगाण्याच्या महफिलींचे वर्णन आहे. आठव्या प्रकरणात बादशहाच्या *चौगातबाजीचे* (घोड्यावरून चेंडू खेळणे) वर्णन असून, त्यात ज्या काठीने हा खेळ खेळला जातो तिच्याशी चेंडूचा काल्पनिक संवाद योजिण्यात आला आहे. शेवटी साक्षीनामा व एक गजल आहे. शेवटच्या प्रकरणात हिंदुस्थानातील हत्तींची महती, सादी आणि हमाम या कवींची स्तुती व स्वतःच्या रचनेचा गौरव वर्णन करण्यात आला असून, शेवटी मसनवीच्या समाप्तीचा उल्लेख आहे.

डॉ. वहीद मिर्जा यांनी या मसनवीसंबंधी काढलेले उद्‌गार लक्षणीय आहेत :

''वस्तुतः हे काव्य ऐतिहासिक आणि सामाजिकदृष्ट्या महत्त्वाच्या अशा माहितीवर आधारलेले असून, मसनवीच्या इतिहासात प्रस्तुत मसनवी विश्वसनीय माहितीच्या

दृष्टीने अनन्य साधारण आहे. या काव्याचे सखोलदृष्टीने परीक्षण करणे उपयुक्त ठरणारे असून, त्यावरूनच या मसनवीचे स्थान योग्यरीतीने निश्चित करता येईल.''*

## *तुगलकनामा*

अमीर खुस्रोच्या ऐतिहासिक मसनवींच्या शृंखलेतील शेवटची कडी म्हणजे *तुगलकनामा* होय. सुलतान गियासुद्दीन तुगलकच्या राजवटीतच ही मसनवी लिहिण्यास खुस्रोंनी प्रारंभ केला. परंतु सुलतान गियासुद्दीनही मसनवी बघण्यास जिवंत राहू शकला नाही व खुस्रोदेखील ही मसनवी पूर्ण करू शकले नाहीत. या मसनवीच्या लेखकालासंबंधी निश्चित मत देणे शक्य नाही परंतु आपल्या आयुष्याच्या शेवटच्या दिवसांत त्यांनी ही मसनवी लिहिली यात मात्र शंका नाही. हजरत शेख-उल्-मशायरव यांचे 18 *रबि-उल्-अव्वल* हिजरी सन 725 ला निधन झाले. यावेळी मोहिमेवर गेलेल्या सुलतान गियासुद्दीन तुगलकबरोबर अमीर खुस्रोदेखील होते. परत आल्यावर त्यांना ही दुःखदायक घटना कळली. यानंतर उरलेले आयुष्य त्यांनी आपल्या या गुरूच्या शोकातच व्यतीत केले. आणि शेवटी 18 *शव्वाल* 725 हिजरीमध्ये या जीवनाच्या बंधनातून कायमचे मुक्त झाले. सुलतान गियासुद्दीन राज्यावर आल्यानंतर त्यांच्या इच्छेवरूनच खुस्रोंनी ही मसनवी लिहावयास प्रारंभ केला असावा. या मसनवीचा शोधदेखील बऱ्याच उशिरा करण्यात आला. बादशाह जहांगीरजवळ असलेल्या हस्तलिखितातसुद्धा प्रारंभीचा व शेवटचा भाग संक्षिप्त होता; आणि म्हणूनच त्याने *हयातीकाशी*ला ही मसनवी पूर्ण करण्याची आज्ञा केली. हयातीने मसनवीच्या प्रारंभी *2752* शेर अधिक घातले.''**

*तुगलकनामा* या मसनवीत ज्या विषयांवर काव्यरचना करण्यात आली आहे ते खालीलप्रमाणे आहेत :

खुस्रोखानकडून सुलतान कुतुबुद्दीन मुबारक शाह खिलजी याचा वध.

खिलजी वंशाचा विनाश.

खुस्रोखानची दोन महिन्यांची राजवट.

गाजी मलिक याचे सुलतान गियासुद्दीन तुगलक हे नाव धारण करून यशस्वी राज्यारोहण.

या मसनवीत आम्हाला अशा काही घटनांची माहिती मिळते जी इतिहास ग्रंथात आढळत नाही. काव्यात्मतेच्या दृष्टीने, वैचारिक दृष्टीने किंवा वाङ्मयीन दृष्टीने ही मसनवी विशेष महत्वाची नसली तरी एक विश्वसनीय ऐतिहासिक लेखन म्हणून त्याकडे दुर्लक्ष करता येणार नाही. (ही मसनवी हैद्राबादहून प्रकाशित झाली आहे).

खुस्रोच्या काव्यात्म व्यक्तिमत्वाचे, त्याच्या गजलरचेनेचे व मसनवी लेखनाचे हे

---

*डॉ. वहीद मिर्जा : *अमीर खुस्रो—जीवन व कर्तृत्व.*

**तत्रैव

ओझरते दर्शन होय. आता त्यांच्या गद्यलेखनाचा विचार केला पाहिजे. काव्याच्या तुलनेत त्यांचे गद्यलेखन फारच कमी आहे.

*खजायन-उल्-फतूह* (किंवा तारीखे अलाई), *एजाजे खुस्रवी* (किंवा रसायल-उल्-एजाज) आणि *अफजल-उल्-फवायद* या त्यांच्या गद्यकृती होत.

वरीलपैकी पहिला म्हणजे *खजायन-उल्-फतूह* हा एक इतिहासग्रंथ असून, त्यांत हिजरी सन *695* ते *711* या काळातील अलाउद्दीन खिलजीच्या विजयी मोहिमांचे वर्णन करण्यात आले आहे. अमीर खुस्रोला पुरविण्यात आलेल्या कागदपत्रांवर या ग्रंथातील माहिती आधारलेली आहे. या ग्रंथात पुढील महत्वाच्या घटना वर्णिल्या आहेत :

1. कडा आणि माणिकपूर येथे सुभेदारपद असताना अलाउद्दीन खिलजीने देवगिरीवर केलेले आक्रमण.
2. त्याचे दिल्लीकडे प्रयाण व राज्यारोहण.
3. राज्यात शांतता निर्माण करण्याचे प्रजेचे कल्याण साधण्याचे प्रयत्न आणि दुर्वर्तन व अधर्माचरण नष्ट करण्याच्या योजना.
4. जामा मशीद, अलाई मीनार, दिल्ली शहराभोवतीचा तट आणि शम्सी तलाव यांचे बांधकाम.
5. मंगोलांच्या विरुद्ध यशस्वी मोहीम व राज्यात कायद्याची कडक अंमलबजावणी.
6. गुजरात व रणथंबोर येथील युद्धात विजय.
7. माळवा आणि चितोड येथील विजय.
8. देवगिरी येथील विरोध मोडून काढण्यासाठी मलिक काफूरच्या नेतृत्वाखाली मोहीम 708 हिजरीमध्ये स्वतः बादशहाने सिवाना येथे मिळविलेला विजय.
9. 709 हिजरीमध्ये मलिक काफूरद्वारा तेलंगणातील विजय.
10. 710 हिजरीमध्ये मलिक काफूरद्वारा 'मंआबर' जिंकणे आणि
11. 711 हिजरीमध्ये विजयी सैन्याचे दिल्लीकडे प्रयाण.

*अफजल-उल्-फवायद* हा अमीर खुस्रोचा दुसरा ग्रंथ असून त्यात त्यांचे गुरू शेख सुल्तान-उल्-मशायव निजामुद्दीन अवलिया यांचे आदेश व उद्गार संकलित करण्यात आले आहेत. हे संकलन हिजरी सन *690* ते *719* या 29 वर्षांच्या काळातील आहे. हजरत निजामुद्दीन अवलिया यांच्या उद्गारांचा, अमीर हसन आला सिजझी यांनी *फवायद-उल्-फयायर* या नावाने केलेल्या संग्रहानुसारच खुस्रोंचेही संकलन आहे. संशोधकांचा एक गट हे मत स्वीकारीत नाही.

*एजाजे खुस्रवी* किंवा *रसायल-उल्-एजाज* ही खुस्रोंची तिसरी गद्यकृती असून, तिचे पाच विभाग आहेत. या ग्रंथात लेखकाने लेखनकला व लेखन पद्धती, काव्य आणि साहित्य व शब्दार्थांचा कलात्मक उपयोग यासंबंधी आपले विचार मांडले आहेत. यावरून त्या काळातील साहित्याचे श्रेष्ठत्व कसे उच्च प्रतीच्या कसोट्यांवर ठरविले जाई, त्याची

कल्पना येते. या दृष्टीने *एजाजे खुस्रवीचे* स्थान बरेच आहे हे स्पष्ट होते. या ग्रंथाच्या पाचव्या भागात खुस्रोंनी आपल्या तरुण वयातील लेखनाचा समावेश केला असून, त्यात काही उपहासात्मक लेख व काही पत्रेही आहेत. या पत्रांवरून अमीर खुस्रोंच्या परिवारातील काही व्यक्तींची व त्यांच्या काही स्नेह्यांची माहिती मिळते. काही पत्रे मात्र काल्पनिक असून, नमुन्यासाठी लिहिलेली आहेत.

या ग्रंथाचे लेखन अमीर खुस्रोने हिजरी सन *719* मध्ये पूर्ण केले

शेवटी *जवाह खुस्रवी* या ग्रंथाचा उल्लेख न केला तर एक महत्वाची उणीव राहून जाईल. या ग्रंथाचे नाव स्वतः खुस्रोंनी दिलेले नाही. खुस्रोंच्या काही वेगवेगळ्या विषयांवरील लेखनांचे यात संकलन करण्यात आले आहे. हे संकलित लेखन पुढीलप्रमाणे आहे.

1. *निसाबे बदी-उल्-अजायब* (चमत्कृतीपूर्ण शोधांसंबंधी)
2. *नज्मे घडियाल* (घड्याळाची रचना)
3. *रुबाइयाते पेशावराण* किंवा *शेरे आसूब* (धंदेवाईकांच्या रुबाया)
4. *खालिकबारी* (विश्वनिर्माता परमेश्वर)
5. *जमीमा-इ-खलिकबारी* (पद्यबद्ध) (पुरवणी)
6. *वीस्तान* : यात कूट रचना व फारसी हिंदी श्लेषावर आधारित उत्तरे असलेल्या प्रश्नात्मक रचनांचा समावेश आहे. (*पहेलिया और दो सुखे*)
7. *कामूस लुगाते* : हिंदी शब्दकोश

इ. स. *1918* मध्ये वरील सर्व विखुरलेल्या लेखांना एकत्रित करून, अलिगढ कॉलेज प्रकाशन संस्थेने ग्रंथरूपाने प्रकाशित केले व *लालीउमान* अथवा *जवाहर खुस्रवी* हे नाव निश्चित केले.

आपण आता संगीतज्ज्ञ या नात्याने अमीर खुस्रोंचा परिचय करून घेऊ या. निसर्गाने खुस्रोंना सुस्वरांची व गायन कलेची देणगी दिलेली होती, ही गोष्ट एक सर्वमान्य सत्य होय. त्यांचे शिक्षक ख्वाजा सुदुद्दीन खत्तात यांनी एक चांगला गायक म्हणून त्यांची ख्वाजा इज्जुद्दीन यांच्याशी ओळख करून दिली होती. इज्जुद्दीन यांनी आपल्या जवळचा एक *दीवान* (काव्यसंग्रह) त्यांच्या हाती देऊन काही शेर म्हणण्यास सांगितले. अमीर खुस्रो त्यावेळी खूपच कमी वयाचे होते; परंतु तरीही ख्वाजा इज्जुद्दीन यांनी त्यांच्या आवाजाची खूपच स्तुती केली. अमीर खुस्रोसारख्या अनेकविध प्रतिभेच्या माणसाला संगीत कलेच्या क्षेत्रातही नैपुण्य प्राप्त करणे कठीण नव्हते. त्यांनी केवळ हे नैपुण्य मिळविले एवढेच नव्हे, तर संगीत कलेत नवनिर्मितीही केली. आपल्या या नवनिर्मितीने हिंदुस्थानी संगीत त्यांनी संपन्न केले. वस्तुतः कव्वाली गायनाची वर्तमान पद्धती ही खुस्रोंचीच निर्मिती होय. 'सतार' *(सीतार)* हे तंतुवाद्यही त्यांनीच प्रथम शोधले. सतारवादनात त्यांनी एवढे कौशल्य प्राप्त केले होते, की आपल्या समकालीन

गोपाळ नायक या श्रेष्ठ संगीततज्ज्ञाशी झालेल्या स्पर्धेत त्याच्यावर विजय मिळवून 'नायक' हा बहुमान प्राप्त केला. संगीतकलेत सर्वतोपरी निपुण असणाऱ्यालाच 'नायक' या पदाचा सन्मान लाभत असे. अमीर खुस्रोने हिंदुस्थानी आणि इराणी संगीताच्या मिश्रणातून बरेच नवीन 'राग' सिद्ध केले. मौलाना शिबली व अमानी यांनी पुढील 'रागां'चे श्रेय खुस्रोला दिले आहे.

*"मुजीर, साजगरी, यमन, मुवाफिक, गनम उश्शाक, जेलफ, फरगना, सरपरदा, बाखेरज, फरादोस्त* आणि *मनम.'*

याशिवाय, *कौल, तराणा, खियाल, नक्श, निगार, बसंत* आणि *सोहिला* हीदेखील त्यांचीच निर्मिती मानली जाते. डॉक्टर वहीद मिर्जा यांनी *सुक्त-उल्-मुवारक* या वाजिद अलीशाहच्या ग्रंथाच्या आधारे असे म्हटले आहे, की *तराणा, छंद, परबंद, गीत, कौल, कल्बाना, नकश* आणि *गल* हीदेखील खुस्रोंचीच निर्मिती होय.* शेवटी, अमीर खुस्रोचा समकालीन प्रसिद्ध इतिहासकार झियाउद्दीन बर्नी याच्या *तारीखे फिरोजशाही*मधील एका समर्पक उताऱ्याने या प्रकरणाचा समारोप करणे इष्ट वाटते.

"अलाउद्दीन खिलजीच्या राजवटीत असे बरेच कवी होते ज्यांच्या तुलनेला उतरू शकणारे कवी आधीच्या अथवा नंतरच्या काळात आढळत नाहीत. या सर्व कवींत आपल्या कल्पनेच्या नवीनतेने व रचनावैपुल्याने अमीर खुस्रो यांचे स्थान श्रेष्ठ होय. गद्य अथवा काव्यरचना समर्थतेने करणारे, कोणत्यातरी एका प्रकारात निपुण आहेत. विविध काव्यप्रकारांचा अवलंब करून त्या सर्व प्रकारांत सारखेच श्रेष्ठत्व प्रस्थापित करणारा खुस्रोसारखा कवी पूर्वी कधी झाला नाही आणि पुढेही कधी होणार नाही. ते बुद्धिमान आणि विद्वान होते तसेच एक सूफीही होते. ते दररोजा रोजा (दिवसभराचा उपवास) पाळीत असत. आपला अधिकतर वेळ ते कुराण पढण्यात, धर्मप्रणीत कर्तव्ये पार पाडण्यात व ठरावीक नमाजांव्यतिरिक्त अधिक वेळा नमाज पढण्यात घालवीत असत. ते हजरत निजामुद्दीन अवलियाचे खास शिष्य होते. आपल्या गुरूचा इतका सुशील आणि प्रामाणिक निष्ठावान शिष्य मी दुसरा बघितला नाही. त्यांना आपल्या गुरूचे प्रेमही भरपूर मिळाले. ज्ञानाच्या एका धुंद अवस्थेत त्यांचे जीवन व्यतीत होत होते. संगीत आणि गायनातही त्यांची कोणी बरोबरी करू शकत नसे. परमेश्वराने त्यांना कलावंताचे आणि सुसंस्कृत मानवाचे सर्व विशेष बहाल केलेले होते. वस्तुतः अमीर खुस्रोसारखी आगळ्यावेगळ्या स्वरुपाची माणसे अनेक शतकांतून एखाद्या वेळी उत्पन्न होतात. अमीर खुस्रो आणि त्यांचे एक सूफी कवी मित्र अमीर हसन यांच्याशी माझी गाढ मैत्री होती. माझ्यावाचून त्यांना आणि त्यांच्यावाचून मला चैन पडत नसे. माझ्यामुळेच त्या दोघांचीही मैत्री जुळून आली होती आणि अनेकदा ते परस्परांच्या घरी जात घेत असत."**

---

* *अमीर खुस्रो—जीवन व कर्तृत्व*

** *अमीर खुस्रो-स-सलीम अमहद-इदारे अदबियाल*—दिल्ली

# सहा

अमीर खुस्रोंचा फारसी व अरबी भाषेवर परिपूर्ण अधिकार होता त्याचप्रमाणे हिंदुस्थानातील इतर बोली व भाषाही त्यांना चांगल्या अवगत होत्या; ही गोष्ट यापूर्वीच स्पष्ट झालेली आहे.

ज्ञानाच्या व साहित्याच्या क्षेत्रातील त्यांचे जे कर्तृत्व आमच्यापुढे आहे त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते, की ते लोकांपासून दूर राहणारे एकांतप्रिय गृहस्थ नव्हते. त्यांच्या आश्रयदात्यांप्रमाणेच सामान्य लोकांतही त्यांना यथायोग्य मान्यता लाभलेली होती. फारसी व अरबी भाषेला बादशाह आणि शाहजाद्यांची मान्यता व आश्रय लाभूनदेखील या भाषा अमीर उमराव, विद्वान मंडळी व शिक्षित वर्गापुरत्याच मर्यादित होत्या. त्यांना लोकमान्यता मिळू शकली नाही. अमीर खुस्रोच्या लोकाभिमुख प्रवृत्तीने त्यांना अशी प्रेरणा दिली होती, की सर्वसामान्यांशीदेखील संबंध ठेवला पाहिजे आणि लोकांच्या भाषेवर प्रभुत्व मिळवून त्या भाषेतून आपले विचार व आपल्या कल्पनांचा आविष्कार करण्याचे सामर्थ्य प्राप्त केल्यावाचून लोकजीवनाशी संबंध प्रस्थापित करणे शक्य नव्हते. इतकेच नव्हे तर आपल्या देशबांधवांच्या रुढी व परंपरा आणि जीवनपद्धतीचे तिऱ्हाईताच्या दृष्टीने निरीक्षण करणेही आवश्यक होते. त्यांची ही जाणीव व त्यांचे हे आकलन हजारो पृष्ठे व्यापणाऱ्या त्यांच्या लेखनावरून उजागर झाल्याविना राहत नाही. हिंदी भाषा जिला ते हिंदवी म्हणत त्यांना चांगल्या रीतीने अवगत होती व याचा त्यांना अभिमानही होता. ते म्हणतात :

"मी एक हिंदुस्थानी तुर्क आहे. मी हिंदवीतच उत्तर देणार. माझ्याजवळ मिसरी साखर (मिसरची खडीसाखर) नाही व म्हणून मी अरबांची बोली कशी बोलणार?"

अन्य एका ठिकाणी ते म्हणतात :

"खरे विचाराल तर मी हिंदुस्थानातील पोपट आहे; जर तुम्हाला माझी गोड वाणी ऐकावयाची असेल तर माझ्याशी हिंदवीत बोला."

सारांश, खुस्रोचे हिंदी वा हिंदवी भाषेचे ज्ञान वरवरचे होते असे म्हटले तर ते अन्यायाचे ठरेल. त्यांना आपल्या हिंदी काव्यरचनेचा अभिमान होता. त्यांना हिंदी भाषेवर प्रभुत्व प्राप्त झालेले होते. हिंदी भाषा ते वाचू शकत होते, लिहू शकत होते व बोलूही शकत होते आणि तिच्यात सहजसुंदर कविताही करू शकत होते. मात्र दुःखाची गोष्ट अशी, की त्यांची हिंदी रचना सुरक्षित राहू शकली नाही व बहुधा स्वतः खुस्रोंनीही ती

सुरक्षित ठेवण्याची काळजी घेतली नाही. आज जी थोडीशी हिंदी रचना त्यांची म्हणून उपलब्ध आहे ती एक तर मौखिक पाठांतराद्वारे परंपरेने चालत आहे किंवा अन्य कोणी तरी आपल्या लेखनात प्रसंगोपात उल्लेखिलेली आहे. खुस्रोची जी हिंदी कविता उपलब्ध आहे ती काही थोडे दोहे आहेत, काही कूट रचना *(पहेली)* आहेत, काही असंगतीवर आधारलेल्या रचना *(ढाकोसले)* आहेत. काही हिंदी फारसी क्लिष्टरच.. *(दोसुखने)* आहेत आणि काही हिंदी फारसी या दोन्ही भाषांचा उपयोग करण्यात आलेले संमिश्र शेर आहेत.

अमीर खुस्रोंनी आपल्या फारसी रचनेत अनेकदा हिंदी शब्दांचा सहजतेने उपयोग केला आहे. उदाहरणार्थ :

*सरे आंदो चश्मे गरदम किचूं हिंदवान रहजन*
*हमा राझे नोक मिश्गां बजिगर जेदा कटारा।*

(यातील *'कटारा'* हा हा शब्द निखळ हिंदी असून त्यांचा अर्थ, कट्यार असा आहे.)

*तुगलकनामा* या मसनवीतील पुढील चरणात हिंदी शब्दांचा व वाक्यप्रयोगाचा केलेला वापर बघा :

*खुख्जे शां 'मार मार' व सरबसर 'मार'*
*बा जारी गुफ्त 'हय हय' 'तीर मारा'*
*यके अज खातां 'हार गोहर' बूद।*

*खजायन-उल्-फतूह* या ऐतिहासिक ग्रंथात पुढील हिंदी शब्द योजिलेले आढळतातः *''पत्रा, कटघर, तिक्का, चंदन, बसैठ, अछूह, तलवाडा, मवासात.''*

याव्यतिरिक्त पुढील वाक्यप्रयोगही लक्षणीय आहेत : *''राम राम, हुस्न धरे छे, मुख फोर झरे छे, डरडर, गूए नाही नाही, नाई नाई, मोरे बापा.''*

फारसी रचनेत हिंदी शब्द योजना करण्याचा खुस्रोचा हा प्रयत्न जाणीवपूर्वक असल्यामुळे निश्चितच कौतुकास पात्र होय. आपण त्याबद्दल त्यांचे कृतज्ञ राहिले पाहिजे. हिंदुस्थानी भाषा आणि साहित्याच्या इतिहासात खुस्रोंच्या या प्रयत्नाला एका आगळ्यावेगळ्या प्रयोगाचे स्थान प्राप्त झालेले आहे. प्रारंभी केवळ मनोरंजनाच्या उद्देशानेही हे घडले असण्याची शक्यता असली तरी आज त्यांत एका नव्या भाषेचा उद्‌गम दिसतो. अबुल फजलने याच भाषेला *देहलवी* हे नाव दिले; त्यानंतर *रीख्ता* (संमिश्र) या नावाने लोक तिला ओळखू लागले व शेवटी हीच भाषा उर्दू हे नाव धारण करून दिल्लीच्या राजसत्तेची सरकारी भाषा झाली. मुसलमानांच्या आगमनापासूनच सांस्कृतिक देवाणघेवाणीव्यतिरिक्त भाषांचे संमिश्रणही सुरू झाले होते. अरबी, फारसी आणि हिंदुस्थानातील स्थानिक भाषांत देवाणघेवाण होत राहिली व त्यांनी परस्परांना प्रभावित केले. याचे प्रत्यंतर खुस्रो पूर्वकालीन मेनुचेहरीच्या पुढील रचनेवरून येऊ शकते.

*''अला ता मोमिनां दारंद रोझा*
*अला ता हिंदवां गीदंद लंघन''*

सांस्कृतिक विकासाचे ते एक अबोधपूर्व रूप होते व कोणतीही शक्ती हा विकास थांबवू शकत नव्हती. अमीर खुस्रोने या दिशेने जाणिवेने वाटचाल केली व एका नव्या भाषेच्या निर्मितीचे श्रेय त्यांना मिळाले. या घटनेने आमच्या संमिश्र संस्कृतीला विविध रीतींनी संपन्न केले आणि नव्या सामाजिक व्यवस्थेला आकार देणाऱ्या शक्तींचे हात बळकट केले.

फारसी हिंदी मिश्र काव्यरचनेव्यतिरिक्त खुस्रोंनी निखळ हिंदीतही काव्यरचना केली आहे. त्यांच्या नावावर अनेक हिंदी दोहे उल्लेखिले जातात; त्यापैकी काही पुढीलप्रमाणे आहेत :

*''गोरी सोवे सेजपर और मुखपर डारे केस*
*चल खुस्रो घर अपने रैन भई चहूं देस''*

(*जवाहरे खुस्रवी* हा दोहा ज्या घटनेच्या संदर्भात म्हटला गेला तिचे वर्णन पूर्वी येऊन गेले आहे.)

*''खुस्रो रैन सोहागकी जागी पीके संग*
*तन मेरो मन पीउको दोउ बहे एक रंग''**
*''चकवा चकवी दोजने इन्हे न मारे कोए*
*यह मारे करतारके, रैन बिछूहा होए''*
*''खुस्रो ऐसी प्रीत कर जैसे हिंदू जूए*
*पोत पराये कारते, जलजल कोयला होए''***
*''श्याम सीत गोरी ले जनमत भई अनीत*
*एक पल मे भर जात है जोगी काके मीत.''****

या दोह्यांचे जनकत्व खुस्रोला देण्यासंबंधी शंका वाटावी असे उघड कारण तर काही दिसत नाही. अर्थात खुस्रोंची हिंदी कविता सुरक्षित राहू शकली नाही; ही घटना मात्र दुःखद खरीच!

सारांश, अमीर खुस्रो, दोन महान संस्कृतींना जोडणारा दुवा असल्यासारखे आहेत. ही मधली वीट काढून टाकली तर सारी इमारत खिळखिळी होईल. हिंदुस्थानातील प्रत्येक वस्तूविषयी त्यांना जे प्रेम वाटते त्यातूनच त्यांच्या व्यक्तित्वाचा हा विशेष उद्भवला आहे. हिंदुस्थानचे हवामान असो की हिंदुस्थानी वातावरण, हिंदुस्थानी भाषा असोत की

---

* *जवाहरे खुस्रवी*

** शफीक लक्ष्मी नारायण : *चमनस्ताने शोअरा.* संपादक : मौलवी अब्दुल हक–औरंगाबाद

*** डॉ. शुजाअत अली संदेलवी : *अमीर खुस्रो और उनकी हिंदी शायरी*

हिंदुस्थानची संस्कृती व सभ्यता, हिंदुस्थानी धर्म असोत वा हिंदुस्थानातील वारे आणि हिंदुस्थानातील लोक असोत वा हिंदुस्थानी फळे व पाने; त्यांना या सर्वांचा अभिमान आहे. आपला जन्म हिंदुस्थानात झाला, इथेच आपण लहानाचे मोठे झालो, आपला विकास झाला याचा त्यांना गर्व वाटतो. जगातील अन्य देशांपेक्षा हिंदुस्थान त्यांना श्रेष्ठ वाटतो. आपली मातृभूमी त्यांना स्वर्गातील उद्यानासारखी वाटते. ते हिंदुस्थानावर प्रेम करतात कारण तो त्यांचा मायदेश आहे आणि पैगंबराच्या आदेशानुसार मायदेशाचे प्रेम हा *ईमानचा* (धर्मनिष्ठेचा) भाग आहे. त्यांच्या दृष्टीने खुरासान, कंदहार व रोमपेक्षा हिंदुस्थान अधिक चांगला आहे. या देशातील उद्याने सदैव बहरलेली असतात आणि वर्षभर फुलांनी व सुगंधांनी ओसंडत असतात. हिंदुस्थानच्या फुलांपैकी चंपा, केवडा, गुलाब, लालह, दवणा, करना, ढाका, शेवंती, जुई, बकुळी, नीलोफर, सदबर्ग, गुलेसफेह, गुलेकूजा, गुलेजरीन, गुलेसुर्ख, बेला, सोसन व कबूद इत्यादी फुलांची त्यांनी मोठी धुंद वर्णने केली आहेत. आंबा हे फळ त्यांचे मनापासून आवडते होते व खरबूजही प्रिय होते. विड्याचा पानांचादेखील निवडक फळाबरोबर उल्लेख केला असून, त्यांच्या दृष्टीने पान हे आरोग्यकारक व रक्त वाढविणारे आहे. शिवाय हिंदुस्थानाबाहेर अन्य कोणत्याही देशात त्याचा आढळ होत नाही. इथल्या फुलांची नावे हिंदुस्थानी असली तरी त्यांपैकी प्रत्येक फूल म्हणजे त्यांना स्वर्गीय उद्यानच वाटते.

हिंदुस्थानी कापडाच्या स्तुतीमध्येदेखील अमीर खुस्रो असेच रंगून जातात. अप्सरांसारख्या रूपवतींच्या अंगावर शोभणाऱ्या देवगिरीच्या मलमलकडे त्यांचे लक्ष अधिक वेधले जाते. हिंदुस्थानातील पोपट पवित्र कुराणातील पक्षांचे पठन करू शकत असल्यामुळे त्यांच्या प्रशंसेस पात्र ठरतो. येथील पोपट माणसांप्रमाणे संवाद करू शकतो, याचेही त्यांना विशेष कौतुक वाटते. हिंदुस्थान त्यांना स्वर्गलोकासारखा वाटतो. त्याचे आणखीही एक कारण आहे. येथे मोर हा स्वर्गीय पक्षी आढळतो आणि हिंदुस्थानाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही देशात तो आढळत नाही.

त्यांचे मन आणि हृदय सदैव त्यांच्या दिल्ली शहराने भारलेले असते. कुठेही गेले तरी ते या सुंदर शहराला विसरू शकत नाहीत. दिल्ली त्यांना न्याय आणि सत्याचे माहेरघर वाटते. आपल्या गुणांनी व वैशिष्ट्यांनी दिल्ली नंदनवनासारखीच जाणवते. या शहराचे वैभव वाढविणाऱ्या इमारतींची ते मनसोक्त स्तुती करतात. मक्केला जर या नजररूप उद्यानाची वार्ता कळाली तर तीदेखील हिंदुस्थानाभोवती घिरट्या घालू लागेल! दिल्लीची जामा मशीद काव्याच्या बरोबरीचीच होय! कुतुबमिनार म्हणजे तर आकाशात जाण्याचा जिनाच होय! हौज-इ-खासमधील पाणी जणू आकाशस्थ तेजाचा स्रोतच होय, असे त्यात प्रतिबिंबित झालेले आकाश बघताना वाटते. दिल्ली महान बादशहा व सम्राटांची राजधानी असून, राजसत्तेचे आधारस्तंभ तेथे राहतात. दिल्लीच्या नागरिकांचे व्यक्तिमत्व देवदूतांचे व चारित्र्य पवित्र आहे आणि साहित्य व काव्य, नृत्य आणि संगीत

व इतर सांस्कृतिक क्षेत्रात त्यांची बरोबरी कोणीही करू शकत नाही. अमीर खुस्रोच्या सौंदर्यवेधी दृष्टीच्या बाणांपासून, दिल्लीच्या गौरवर्ण सुंदरी अर्थातच सुरक्षित थोड्याच राहू शकणार? दिल्लीच्या सहजसौंदर्याने नटलेल्या लावण्यवती सदैव त्यांच्या मनाला व हृदयाला व्यापून असत. त्या मानिनी आपल्याच तोऱ्यात असतात; कधीच कोणाचे काही ऐकत नाहीत. ज्या वाटेने त्या आपल्या डौलदार चालीने चालत जातात, त्या वाटेवर फुले उधळतात. परिस्थती अशी निर्माण होते, की आपल्या सौंदर्याच्या प्रभावाची जाण नसलेल्या या सुंदरी गजाप्रमाणे पुढे पुढे चालत असतात आणि त्यांच्यामागे त्यांच्या प्रेमिकांचा घोळका, डोळ्यांतून रक्ताचे अश्रू ढाळीत येत असतो. या रूपगर्विता तारुण्यमदाने धुंद होऊन हृदयाचा व्यवहार करणाऱ्यांना उद्ध्वस्त करावयास सिद्ध असतात. सारांश, या सुंदर बालांनी कटाक्ष टाकले होते आणि तेही त्यांच्या केशकलापाचे बंदिवान झाले होते.

थोडक्यात म्हणजे, खुस्रोंनी हिंदुस्थानी संस्कृतीच्या प्रत्येक पैलूचा तिऱ्हाईताच्या अलिप्त दृष्टीने विचार केला होता व हिंदुस्थानी जीवन संस्कृतीपासून शक्य तो लाभ घेतला होता. या भूप्रदेशाशी संबंधित प्रत्येक वस्तू त्यांच्या अवधानाचे केंद्र बनली. आधी वर्णन केल्याप्रमाणे स्वतः खुस्रोंनी आपण हिंदुस्थानातील अनेक भाषा जाणत असल्याचे निवेदन केले आहे. आपल्या या अनेक भाषाकोविदत्वाविषयी माहिती देताना ते सांगतात, की त्या भाषांपैकी काही त्यांना कळतात, काही त्यांना उत्तम रीतीने अवगत आहेत व काहींना त्यांनी आपल्या काव्यात्म आविष्काराचे माध्यम बनविले आहे आणि त्यांपासून ज्ञान व शहाणपण तसेच बुद्धिमत्ता व निरीक्षणशक्ती प्राप्त केली आहे. त्यांनी या संदर्भात बऱ्याच भाषांचा नामोल्लेख केला आहे परंतु ते म्हणतात, की या सर्व भाषांशिवाय 'संस्कृत' नावाची एक आणखी भाषा असून, कला आणि विद्यांचा निधीच, असे तिचे स्वरूप आहे. अमीर खुस्रोंच्या मताप्रमाणे संस्कृत भाषा, व्याकरण, साहित्य आणि अन्य विद्या शाखांमध्ये फारसीपेक्षा श्रेष्ठ व अरबीच्या बरोबरीची आहे. *कलीला व दमना* (पंचतंत्राचे रूपांतर) ज्यात केवळ बुद्धी आणि व्यवहारज्ञानाच्या गोष्टी आहेत, येथेच व संस्कृत भाषेतच मूलतः लिहिले गेले आहे. हिंदुस्थानाच्या ज्ञानक्षेत्रातील महत्तेचे समर्थन करताना त्यांनी दहा पुरावे दिले आहेत; त्यापैकी एक पुरावा असा, की हिंदुस्थानात संगीतविद्येची जेवढी प्रगती झाली तेवढी अन्यत्र कोठेच झाली नाही. येथील संगीत हरिणांनादेखील मोहित करते.

अमीर खुस्रो हिंदूंना इस्लामेतरांत श्रेष्ठ समजतात, हिंदू धार्मिक दृष्टीने, परमेश्वराचे एकत्व, आणि कलातीत्व मानतात. या विश्वाचा तो निर्माता असून, संत असो की अज्ञजन, विरक्त असो की मोहभ्रष्ट, सर्वांचे भरणपोषणही तोच करतो. प्रत्येक जीवमात्रास तोच चैतन्य प्रदान करतो. परमात्माच पाप अथवा पुण्याचा तसेच नीती अथवा अनीतीचा, चांगल्या अथवा वाईटाचा निर्माणकर्ता आहे. त्याची सत्ता अनादी व

अनंत आहे. अनादी कालापासून तोच सर्व गोष्टींचा सर्वतोपरी कर्ताकरविता आहे. अशा रीतीने हिंदू व मुसलमान यांची बरीच धर्मतत्वे समान आहेत, असे अमीर खुस्रोंना वाटते. चारी वेदांचा उल्लेखदेखील ते अत्यंत आदराने करतात. वेद म्हणजे ज्ञानाचा व सत्याचा निधीच होय, असे त्यांना वाटते.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे हजरत निजामुद्दीन अवलियांनी खुस्रोंचा जणू कायाकल्पच करून टाकला होता आणि तेदेखील आपल्या आत्मप्रकाश लाभलेल्या गुरूच्या इतक्या निकट आले होते, की त्यांच्या पायाशीच दफन होऊन आजही त्यांच्याजवळ वास्तव्य करून आहेत. ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीने हे जग परमात्म तेजाचाच प्रकाश असून, ईश्वरी गुणांपैकीच एक होय. धर्मपालनाच्या दृष्टीने त्यांचे जीवन पैगंबराच्या जीवनग्रंथाची प्रस्तावनाच होय. यावरून एक गोष्ट कळू शकते, की अमीर खुस्रो विरक्ती स्वीकारून जगापासून दूर एकांतवासात गेलेले नसले तरी त्यांनी आपले व्यक्तिमत्व सद्‌वृत्तीच्या साच्यात ढाळले होते. परंतु लबाडी, खोटेपणा, कपट यांचा अवलंब करणाऱ्या तथाकथित तत्वचिंतक दिखाऊ विद्वानांच्या उणिवांकडे त्यांनी डोळेझाक केली नव्हती. अशा लोकांना ते कलावंतिणींच्या साजिंद्यांची उपमा देतात, ज्यांच्या बाह्या आखूड आणि हात लांब असतात. हे लोक फकिरीचा, अनासक्तीचा दावा करत असतात व त्यांचा द्रव्य मागण्याचा उद्योगही चालू असतो.

फकीर म्हणजे व्यापार नव्हे. खुस्रोंच्या दृष्टीने लालसा व वासनातृप्तीच्या हेतूने प्रार्थना करणाऱ्यापेक्षा मनाने पवित्र असणारा मद्यपी, जुगारीदेखील अधिक बरा म्हटला पाहिजे. ज्याला द्रव्याचे प्रेम असते त्याला *दरग्या*चे प्रेम असू शकत नाही. *शरीयत* (इस्लामचा धार्मिक कायदा) जरी द्रव्यार्जनाची परवानगी देत असली तरी फकिरीच्या वाटचालीत द्रव्यार्जन कपटासारखेच होय.

अमीर खुस्रोंनी केवळ सूफींची लबाडी व ढोंग उघड केले एवढेच नव्हे, तर त्याच कसोटीवर त्यांनी आत्मपरीक्षणही केले आहे. आपल्या मनाची त्यांनी निंदा केली आहे. आपले वासनालोलुप शरीर पावित्र्याच्या पिंजऱ्यात बंदिस्त करावे अशी त्यांची उत्कट इच्छा होती. जगातील प्रत्येक गोष्टीपासून अलिप्त होऊन, जेथे लोकांचा वाराही लागणार नाही अशा ठिकाणी जाऊन राहावे असे त्यांना वाटत होते. परंतु ईश्वरी कृपेवाचून वासनांचा जुलूम थांबणे शक्य नव्हते. असे दिसते, की त्यांच्या जीवनाचा लगाम, वासना आणि लालसेच्या दैत्यांनी हाती धरलेला आहे. शरीरस्थ आत्म्याच्या पिंजऱ्यात सैतानांचा घोळका जमलेला आहे. आतमध्ये मनाचा शत्रू सतत बंड करीत आहे. परंतु बाहेर मात्र तो सैतानावर झेप घेण्यासाठी दबून बसत आहे. अंतरंगात सुखविलासांनी ते आनंदित होतात आणि बाहेर मात्र आपल्या विरक्तीचा अभिमान मिरवितात. एकूण काय तर आयुष्याची पन्नास वर्षे उलटली तरी निषिद्ध गोष्टींच्या तावडीतून सुटण्याचे भाग्य त्यांना लाभले नाही. पण नंतर मात्र असे एक तेज उदित झाले ज्याने वासनासुखांचा दीप

विझवून टाकला व लालसा मनातून दूर गेली. विलासोपभोगांनी मन भरून गेले व अस्वस्थता आणि गर्व नाहीसे झाले. साकीचे निमंत्रण निष्प्रभ ठरले आणि सुरईचा सलाम स्वीकारण्यास त्यांनी नकार दिला. तेजस्वी गुरूने खुस्रोला बळकट केले व वासनेचे वेड त्यांच्या डोक्यातून निघून गेले.

अमीर खुस्रोच्या दृष्टीने जीवन म्हणजे काही श्रेष्ठ मूल्यांची जपणूक होय. जन्माला येणे, कसेबसे जगणे व शेवटी मृत्यूच्या कुशीत पहुडणे म्हणजे खरे जीवन नव्हे. सार्थता, अभिमान व कीर्ती प्राप्त करून देणारे विचार प्रत्यक्ष कृतीत आणल्यानेच जीवनाच्या रेखाकृतीत रंग भरला जातो. सत्यनिष्ठा व सत्शील, ज्ञान व बुद्धिमत्ता, प्रेम व सौजन्य, मार्दव व दातृत्व, सहानुभूती व आपुलकी, भल्याबुऱ्याची चाड व मनाचा मोठेपणा, संयम व सहनशीलता, कळवळा व हाताचा सढळपणा आणि कृपा व दया या गोष्टीच खऱ्या अर्थाने मानवी जीवन प्रवासात उपयुक्त ठरणाऱ्या आहेत; यांच्या संगतीनेच जीवनाचा प्रवास यशस्वी व कीर्तीसंपन्न होत असतो आणि या गोष्टीच माणसाला जनावरापेक्षा वेगळा आणि श्रेष्ठ ठरवीत असतात.

जीननाच्या या महत्वाच्या अंगाकडे खुस्रोंनी दुर्लक्ष केलेले नव्हते, आणि म्हणूनच त्यांच्या काव्यात जागोजागी शहाणपण, व्यवहार ज्ञान व नैतिक उपदेश भरपूर प्रमाणात आढळतात. *लैला मज्नू, शिरीनफरहाद* व *आइन-ए सिकंदरी* या आपल्या मसनवींमध्ये खुस्रोंनी अनुक्रमे ऐनुद्दीन खिजर, मसऊद व अमीर जाई या आपल्या तीन मुलांना विस्ताराने उपदेश केला आहे; *हिश्त वहिश्त* या मसनवीत आपल्या मुलीलादेखील कटाक्षाने पवित्र व सद्वर्तन सांभाळण्यास सांगितले आहे. याच मसनवीत अलाउद्दीन खिलजीसारख्या मनस्वी बादशहालादेखील त्यांनी उपदेश केला असून, समाजजीवनाच्या शांततेचा व समृद्धीचा आधार असणारी, राजा म्हणून असलेली त्याची कर्तव्येही निवेदन केली आहेत.

अमीर खुस्रोंची उद्दिष्टे व त्यांचे विचार त्यांच्या भावना व संवेदना आणि या जीवनाविषयी व जीवनसंबंधित गोष्टीविषयीच्या कल्पना अशा आहेत. ज्या देशात ते जन्मले, वाढले आणि जेथल्या भूमीत त्यांनी चिरविश्रांती घेतली त्या देशाबद्दल व त्या देशातील प्रत्येक वस्तूबद्दल त्यांना उत्कट प्रेम आणि जिव्हाळा वाटत होता. ते एकांतप्रिय नव्हते. जीवनसंग्रामात संघर्ष करीत असताना त्यांनी हिंदुस्थानी संस्कृतीचा सखोल अभ्यास केला. ही संस्कृती आपल्या व्यक्तिमत्वात मुरवून घेतली. ते जर एकांतवासात राहते तर त्यांना जी सर्वमान्यता मिळाली ती मिळाली नसती.

जे काही त्यांनी लिहिले ते त्यांच्या अनुभवाचे व निसर्गदत्त शैलीचे फळ होय. अमीर खुस्रोसंबंधी बोलणे म्हणजे कोणा एका व्यक्तीविषयी बोलणे नव्हे तर एका सांस्कृतिक उत्क्रांतीची जाणीव करून घेणे होय. अमीर खुस्रो या उत्क्रांतीचे द्रष्टे व आपल्या परिपूर्ण व्यक्तिमत्वाने तिच्यात जोम निर्माण करून तिला गतिमान करणारे होते. खुस्रोंना जाऊन

सहाशे वर्षे लोटली. हा काळ एखाद्या राष्ट्राच्या दृष्टीनेही कमी नव्हे मग व्यक्तीचा तर प्रश्नच नाही. पण आजही त्यांची स्मृती तशीच टिकून आहे. विद्वानांत व अभ्यासकांत आजही त्यांना मान्यता आहे. सर्वसामान्य लोकांत ते आजही प्रिय आहेत आणि काव्याच्या व साहित्याच्या क्षेत्रात त्यांच्याविषयी तोच जिव्हाळा आजही आहे; जणू ते सदेह आमच्यात वावरत आहेत. कवी मीर यांचे उद्गार सत्य आहेत :

*मत सहेल हमे जानो, फिरता है फलक बरसों*
*तब खाकके परदेसे इन्सान उभरते है*

(अर्थ—आम्हाला इतकं सुलभ समजू नका. कालचक्र वर्षानुवर्ष फिरत राहिल्यानंतरच मातीतून मानवांचा उद्‌भव होत असतो.)

# निवडक वेचे

## हम्द

(मूळ फारसी)

(हम्द म्हणजे ईशस्ववन. हा हम्द मुळात गजलेच्या रुपात रचलेला आहे. येथे गद्य अनुवाद दिलेला आहे.

हे परमेशा, तू आमच्या कल्पनेच्याही भरारीपलीकडे आहेस. आमच्या ऐंद्रीय संवेदनांना तू कसा बरे गम्य होणार? तुझ्या महान अस्तिवाच्या शिखरापर्यंत आमची अडखळणारी बुद्धी कशी बरे पोहोचू शकेल? सर्व मानव, पशू आणि पक्षी हे जर तुझ्या दाराशी पडलेल्या धुळीसारखे आहेत, तर मग ही क्षुद्र धूळ तुझ्या प्रकाशमय वस्त्राला कशी बरे वेटाळू शकेल? तुझ्या महान सामर्थ्याचा उंच मीनार अनंत अवकाशाच्याही किती तरी पलीकडे गेला आहे; आमच्या विचारांचा पंखहीन पक्षी हे अनंताचे अंतर कसे बरे झेपावू शकेल? तुझ्या कृपाप्रसादावाचून हुसेनसारखे हजारो हुतात्मे नदीकाठीदेखील तहानेने व्याकुळतात आणि मृत्यूपर्यंत तहानलेलेच राहतात. जिथे पवित्र आत्म्यालाही क्वचित राहता येते त्या स्वर्गीय उद्यानातून, आमच्या निष्ठावान जाणीवेला जीवनदायी सुगंध कसा बरे लाभावा? मानवी हृदयाचे पार्थिव सिंहासन अनेकदा तू आपल्या अस्तित्वाने शोभवितोस; तरी पण, या झाकळलेल्या मानवी कलांनी तुझे ते अस्तित्व अनुभवावे कसे? मक्केची वाटचाल करणाऱ्या काही भाग्यवंतांना तुझ्या कृपेच्या खुणा जाणवू लागतात; पण या पाखंडी खुस्रोला मात्र भोवताली मूर्ती आणि मूर्तीवाचून काहीच दिसत नाही. अरे, तुझा धिःकाराचा भाला माझ्यासारख्या क्षुद्र गुलामावर पडू दे. जे तुझे चांगले सेवक होतील त्यांच्यावर तुझ्या कृपेचा अमर्याद वर्षाव होऊ दे.

## गजल

(मूळ फारसी)

1

बघ, आपल्या रेखीव शरीराला हेलकावे देत
तू माझ्याकडे पुन्हा येत आहेस
हे माझ्या प्रिये, तुझे डोळे धुंदीने जडावले आहेत.

कोठे होतीस सुखसोहळ्यात मग्न?
कोणाच्या विरहोत्कंठित हृदयाला तू आनंदी केलेस?
हे विश्वासघातकी सखे, प्रांजलपणे काय ते सांगून टाक
युसुफने आपले सुंदर रूप विहिरीत लपविले
तसे तू आपले चंद्रासारखे मुख कोठे लपविलेस?
मी तुझ्यासाठी तळमळत होतो; पण हे निष्ठुर प्रिये
तू कुठे भटकत होतीस?
तुझ्या प्रकाशमान कपोलांच्या तांबूस छटेतील ज्वालेने
कोणाच्या बरे हृदयाने नव्याने पेट घेतला?
गत सायंकाळी कुठे बरे मद्याचे घोट तू प्राशन केलेस?
आणि मद्याचा चषक कोणाच्या बरे हाती दिलास?
तुझ्या जीवनाच्या झऱ्याने अंधारात
कोणाचे बरे तहानलेले ओठ ओलावले?
हिना आणि कस्तुरीचा गंध असलेले तुझे धुंद जडावलेले शरीर
कोणी बरे आपल्या आतुर बाहूत वेटाळले
कोणाच्या बरे आदेशानुसार
आपला निसर्गदत्त अभिमान सोडून तू लीन झालीस?
कोणी त्या ओठांचे चुंबन घेतले आणि कोणी
त्या चमकत्या काळ्याभोर केशकलापास कुरवाळले?
खरं सांग, कोणी तुला आपल्या लडिवाळ
ऊबदार स्पर्शाने पुलकित केले?
तुझ्या गालांचा गुलाबी रंग फिकट आहे;
तुझ्या डोळ्यांतील फुललेला निखारा मंदावला आहे.
अरे खुस्रो मला सांग,
कोणाला तू तिचा सुंदर मुखडा दाखविला होतास?

## गजल

(मूळ फारसी)

**2**

हे सखे, ये; आणि या दैवाहताचा
थोडा तरी विचार कर.
तुझ्या पापण्यांच्या लांब रेशमी केसाआडून
तुझ्या डोळ्यांचे तेज चमकत आहे.

मी उघड उघड व अनाहूत तुझ्याकडे आलो
आणि तू माझ्यापासून दूर निघून गेलीस
माझ्या साहसाला खरोखर कशी शिक्षा हवी
हे दाखविण्यासाठीच हे घडले असावे.
तू निघून गेलीस आणि मला चांगले माहीत आहे
की दुःखातून माझ्या जीवनाची आता सुटका नाही.
कारण या नव्या संघर्षाला तोंड देण्यासाठी
नवा जोम मी आता कुठे शोधू?
प्रिये परत ये आणि थोडा वेळ तरी
माझ्या जवळ बस. त्यात काय बरे त्रास आहे?
तुझ्या प्रकाशमान अस्तित्वाने एखाद्या खिन्न हृदयाला
एक क्षणभर ऊब मिळाली तर काय बिघडले?
माझे आयुष्य संपते आहे; पण मला त्याची खंत नाही
खंत आहे ती एकच, की तू जवळ नाहीस
शक्य असेल तर परत ये, कारण हे दुःख आता सोसत नाही.
बघ, सारी रात्र खुस्रो दुःखात आहे
तुझ्या गडद काळ्या लांब केसांप्रमाणे त्याचे हे दुःख होय.
ये, प्रिये ये, सावरून बांध ते केस
आणि त्याचे दुःखही कमी कर.

## गजल

(मूळ फारसी)

**३**

धुंद गुलाब अरुणोदयालाच जागा झाला,
आणि खसखशीच्या फुलाचाच पाक मधुर मद्याने भरून गेला;
गुलाबाच्या शेजारी जाई अजून अर्धवट झोपेत होती,
तर पलीकडे सरळ आणि देखणा सुरूचा वृक्ष ताठ उभा होता;
वारा मंद वाहत होता, नरगिस डुलक्या घेत होती,
तिचे शरीर डुलत होते, कधी वाकत होते, कधी उंचावत होते;
माझ्या सखीशेजारी मी बागेत पहुडलो होते, जागा होतो,
माझी सखी खरोखर प्रत्यक्ष चंद्रच होती;
पण अरेरे, लवकरच माझ्या शेजारून ती उठून गेली,
आणि माझ्यासाठी केवळ दुःख मागे ठेवून गेली.

## फारसी हिंदी मिश्रित गजल : खुस्रोचा अभिनव उपक्रम

*झे हाले मिस्कीं मकन तगाफुल-दुराये नैना बनाये बतियां के ताबे हिजरां न दारम ऐ जां-न लेहु काहे लगाये छतियां शदाने हिजरां दराज चूं जुल्फ-न-रोजे वस्लत वुं उम्र कोताह सखी पियाको जो मैं न देखूं तो कैसे काटूं अंधेरी रतियां यकायक अज दिल दो चष्मे जादू बसद खराबेम सब्रे तस्कीज किसे पड़ी है जो जा, सुनावे पियारे पिकों हमारी बतियाँ, चूं शम्मा सोजा. चूं जर्रा हैरां, हमेशा गिरयां बदूष्क आं मह ननीं-द नैनां, न अंग चैनां, न आप आवें न भेजे पतिया बहक्के रोजे विसाले दिलबर के दाद मारा फरेब खुस्रो सपींत मनकी बराये राखूं जो जाने पाऊं पियाकीं घतियां.*

### गुजरी

*गुजरी तू के दर हुस्नो लता फत चूं मही*
*ईं देगे दही बरसरे तू चत्रे शही*
*अज हर दो लबत शहद व शकर मी रेजद*
*हर गाह कि मी गोई दही लेइहो दही.*

(हे गुजरी आपल्या रूपाने व कोमलपणाने तू चंद्रासमान आहेस. तुझ्या डोक्यावरी हे दह्याचे मडके राजछत्रासारखे आहे आणि जेव्हा तू 'दही घ्या दही' म्हणतेस तेव्हा तुझ्या ओठांतून मध व साखर वाहू लागते.)

### मुकरनी

(श्लिष्ट शब्दयोजनेवर आधारलेला हा रचनाप्रकार छेकापन्हुती अलंकारासारखा आहे.)

1

*सगरी रैन मोरे संग जागा—भोरभई तब बिछड्यां लागा*
*उसके बिछडे फायत हिरा-ऐ-सखिसाजन? ना सखि 'दिया'*

2

*आप जले और मोहे जलाये—पीपी कर मरदमूंह भर आते,*
*पक मैं अब मारूंगी मुल्ला—ऐ सखी साजन? ना सखी 'हुक्का'*

3

*नित मोरे खातर बजारसे आवे—करे सिंगार तब जो माया पावे*
*मन बिगडे न रे, राखत मान—ऐ सखी 'साजन'? ना सखी 'पान'*

## बसंत

*दय्यारी माहे भिजो यारे—शाह निजाम के रंग मे*
*कपडे रंगनेसे कुछन होत है*
*या रंग मे मैने तनको डुबो यारे—दय्यारी माहे*
*बाही के रंग से सुन वेशूख रंग*
*खूबही मलमल धोयारे—पीर निजाम के रंगमे भिजोया रे*

## सावन का गीत

*बेटी तेरा बावा तो बुट्टा री—की सावन आया*
*अम्मा मेरे भाई का भजो जी—के सावन आया*
*बेटी तेरा भाई तो बालारी—के सावन आया*
*अम्मा मेरे मामूंका भजो जी—के सावन आया*
*बेटी तेरा मामूं तो बांका री—के सावन आया*

## बूझ पहेलियां

(उत्तर समाविष्ट असलेले उखाणे)

***आरी* (करवत)**

*एक नारवो दांत दंतेली—पतली दुबली छेलछबेली जब बा तिरयाको (त्या स्त्रीला) लागे भूख*

***सूखे हरे चनावे रूक* (वृक्ष—लाकूड)**

*जो कोई बतावे बांके बलहारी—खुस्रो कहे व रे को 'आरी'*

***आग***

*पवन चलत वह देह बढावे—जल पीवत वह जीव गंवाए*
*है वह प्यारी सुंदर नार—नार नही पर है वो 'नार' (आग)*

***आईना* (आरसा)**

*फारसी बोली आईना—तुर्की ढूंढी पाईना*
*हिंदी बोलूं तो आरसी आये—खुस्रो कहे कोई न बताये*

***छत्री***

*घूम घमेला लेहंगा पेहने एक पांवपे रही खडी*
*आठ हाथ हैं इस नारीके सूरत इसकी लगे परी*
*सब कोई इसकी चाह करे हैं गब्र (पारसी) व मुसल्मां हिंदू छत्री (क्षत्रिय)*
*खुस्रोने यह कही पहेली दिलमे अपने सोच जरी*

***लोटा***

*गोल मोल और छोटा मोटा—हरदम वह तो जमीनपे लोटा*
*खुस्रो कहे यह नही है छोटा—जो ना बूझे अक्कल का खोटा*

***मोरी***

*सावन भादों खूब चलत है माघ पूसमे थोडी*
*अमीर खुस्रो यूं कहे तो बूझ पहेली 'मोरी'*

***नाखून* (नख)**

*हाड की देही उज्जल रंग—लिपटा रहे नारीके संग*
*ना मारा नाखून किया—वा का सिर क्यूं काट लिया*

***नात* (नौका)**

*जलजल चलता बराता गांव—बस्तीमे ना वा का ठाव*
*खुस्रोने दिया वा का नाव—बूझो अरथ जा छोडो गांव*

***नक्कारा* (नगारा)**

*नर नारी की जोडी दीटी—जब बोले तब लागे मीठी*
*एक नहाए एक तापत हारा—चल खुस्रो कर कूच नकारा*

## बिन बूझ पहेलियां

(उत्तर समाविष्ट नसलेले उखाणे)

***आदम* (पहिला मानव)**

*बिधनाने एक पुरुष बनाया—तिरया (स्त्री) दी और नीर लगाया*
*चूक भयी कुछ वा से ऐसी—देस छोड भयो परदेसी*

***आस्मान* (आकाश)**

*एक थाल मोतियोंसे भरा—सबके सिरपर औंधा खडा*
*चारों ओर वह थाली फिरे—मोती इससे एक न गिरे*

***आम*** **(आंबा)**

*एक पुरुख जब मदपर आये लाखों नारीसंग लिपटाये*
*जब वह नारी मदपर आये--जब वह नारी नर कहलाये*

***आंख*** **(डोळा)**

*आवे तो अंधेरी लाये—जावे तो सुख ले जाये*

***आईना*** **(आरसा)**

*क्या जानूं वह कैसा है—जैसा देखूं वैसा है*
*अरथ तो इसका बूझेगा—मूंह देखो तो सूझेगा*

***अबरू*** **(भुवई)**

*स्याम बख्त एक नारी—मायेऊपर लागे प्यारी*
*जो मानस इस अरथ को खोले—कुत्तेकी वह बोली बोले*

***बांसरी***

*बांस बरेली सेयक नारी—आई अपनी बंद कटारी*
*पी कुछ उसके कानमें फूंकी—बोली वह सुन पियाके मूहँ की*
*आह, पिया ये कैसे कीनी—आग बिरहकी भडका दीनी*

***बत्ती चिराग*** **(दिव्याची वात)**

*एक राजाकी अनोखी रानी—नीचेसे वह पीये पानी*

***भुट्टा*** **(मक्याचे कणीस)**

*एक तरवर का फल है तर—पहिले नारी पीछे नर*
*वा फलकी यह देखो हाल—बाहर खाल और भीतर बाल*

***पान*** **(विडा)**

*एक गुनीने यह गुन कीना—हरियल पिंजरेमे दे देना*
*देखो जादूगर का हाल—डाले हरा निकाने लाल*

***पसीना*** **(घाम)**

*धूपोंसे वह पैदा होवे—छांव देख मुरझाये*
*अयरे सखी मैं तुझसे पूछूं—हवा लगे मर जाये*

**शमा (मेणबत्ती)**

*यक नारी के सर पर नार (आग)*
*पीकी लगनमे खडी लाचार*
*सीस धने और चले न जोर*
*रो रो कर वह करे है भोर*

**कंकव्वा (पतंग)**

*एक कहानी मैं कहूं, तू सुनलो मेरे पूत*
*बिना परों वह उड़ गया गले मे बांधे सूत*

Lasertypeset by Ess Ess Enterprises, New Delhi
and printed at Beauty Print, New Delhi